( आचार्य सकलकीर्तिकृत )

# सुभाषितावलि

सार्थ

व

# सज्जनचित्तवल्लभ

( मल्लिषेणाचार्यकृत )

सार्थ



---

हें पुस्तक

**जैनेतिहाससारचे व्यवस्थापक**

यांनीं केलें

तें

**रा. रा. वालाचंद कस्तुरचंद धाराशिवकर**

यांणीं

बेळगांव येथें " बेळगांव समाचार " छापखान्यांत

छापून प्रसिद्ध केलें.

---

सन १८९७ इसवी.

---



---

किंमत १८३.

# प्रस्तावना

---

ह्या सुभाषितावलीची एक प्रत वर्धा जैन पाठशाळेंत कोणी ब्राह्मण-सन्याशी जैनमतानुयायी झालेले, गुजराथेंतून आले होते त्यांचेकडून मिळाली; ही अतिशय अशुद्ध असल्यानें व दुसरी प्रत न मिळाल्यानें सोलापूर जैन पाठशाळेचे माजी संस्कृत शिक्षकांकडून ही शुद्ध करण्याचा मीं यत्न केला, परंतु जैनमताचें पुस्तक त्यांनीं शुद्ध करण्याचें नाकारल्यामुळें मीच आपल्या समजुतीनें हें शुद्ध केलें आहे. मूळकवीचें कवित्व वास्तविक प्रशंसनीय नाहीं, फक्त त्याचा नीतिप्रसाराचा मुख्य हेतु आहे, हें पुस्तक सर्वतोपरी शुद्ध झालें असेल अशी माझी खात्री नाहीं. अशुद्ध असलेल्या जागीं नव पाठ मीं घातल्यानें अक्षरें... पडलीं असतील; परंतु अर्थ भलताच न होईल अशी पूर्ण खबरदारी घेतली आहे. ह्याचे दोन फार्म बेळगांव रामतत्व छापखान्यांत फारच अशुद्ध छापले गेल्यानें त्याचे पुढेंच त्याचें शुद्धिपत्र जोडलें आहे. हिंदी अर्थ रा. रा. नेमचंद देत होते. परंतु त्यांस वेळ नसल्यानें त्यांचा निरुपाय झाला, सबब हिंदी अर्थ तिसर फार्मापासून बंद केला आहे. कोल्हापूर भट्टारकांचे पुस्तकालयांतील सुभाषितावलीची पुन्हा एक प्रत जयरावाकडून मिळून दोन्ही प्रती ताडून पाहतां ती प्रत देखील माझे मूळप्रतीसारखीच अशुद्ध असल्यानें व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. ह्या सुभाषितावलीचे कर्ते कोणी आचार्य सकलकीर्ति नांवाचे जैनमती मुनि होते. त्यांचा जन्ममृत्यूचा काळ समजत नाहीं.

सज्जनचित्तवल्लभ काव्याचे २४ श्लोक अर्थासह ह्याच पुस्तकांत सामील केले आहेत, कारण हे श्लोक ही सुभाषितावलीसारखेच बोधपूर आहेत. ह्या श्लोकांचे कर्ते श्रीमल्लिषणाचार्य ह्मणून कोणी जैनमती कवि होते. ह्याचे किंमतीसह सुभाषितावलीची किंमत १८३ ठविली आहे.

बेळगांव<br>ता. १।११।९७

व्यवस्थापक<br>जैनेतिहाससार.

---

# सुभाषितावलीची विषयानुक्रमणिका.


| विषय | पृष्ठ |
|---|---|
| १ | २ |
| पीठिका | .... १ |
| धर्मवर्णनं | .... ४ |
| पापवर्णनं | .... ९ |
| सम्यक्त्ववर्णनं | .... ११ |
| मिथ्यात्ववर्णनं | .... १२ |
| ज्ञानवर्णनं | .... १४ |
| चारित्रवर्णनं | .... १५ |
| इंद्रियजयवर्णनं | .... १७ |
| नारीसंगत्यजनवर्णनं | .... १८ |
| नारीरूपमध्ये विचारवर्णनं | .... १९ |
| कामत्यजनवर्णनं | .... २१ |
| वीतरागसेवनवर्णनं | .... २२ |
| निर्ग्रंथगुरुसेवावर्णनं | .... २३ |
| तपोवर्णनं | .... २४ |
| जिव्हावशीकरणवर्णनं | .... २५ |
| द्वेषवर्णनं | .... २७ |
| रागत्यजनवर्णनं | .... २८ |
| क्रोधत्यजनवर्णनं | .... २९ |
| मानत्यजनवर्णनं | .... ३० |
| मायात्यजनवर्णनं | .... ३१ |
| लोभत्यजनवर्णनं | .... ३२ |
| दयावर्णनं | .... ३३ |
| सत्यवर्णनं | .... ३५ |
| अदत्तत्यजनवर्णनं | .... ३६ |
| शीलवर्णनं | .... ३८ |
| परिग्रहत्यजनवर्णनं | .... ३९ |
| वैराग्यस्वीकारवर्णनं | .... ४१ |
| गुणिसंगवर्णनं | .... ४२ |
| जिनपूजावर्णनं | .... ४३ |
| पात्रदानवर्णनं | .... ४४ |
| कुपात्रत्यजनवर्णनं | .... ४२ |
| चैत्यालयादिकरणवर्णनं | .... ४७ |
| भावनावर्णनं | .... ५० |
| रात्रिभोजनत्यजनवर्णनं | .... ५२ |
| गृहत्यजनवर्णनं | .... ५३ |
| देहवैराग्यवर्णनं | .... ५४ |
| संसारवैराग्यवर्णनं | .... ५५ |
| भोगत्यजनवर्णनं | .... ५७ |
| धीरत्ववर्णनं | .... ५८ |
| शोकत्यजनवर्णनं | .... ५९ |
| नीरस्नानत्यजनवर्णनं | .... ६० |
| शरीरसाफल्यवर्णनं | .... ६२ |
| निर्माल्यत्यजनवर्णनं | .... ६६ |
| व्रतभंगत्यजनवर्णनं | .... ६८ |
| समाधिवर्णनं | .... ६९ |
| आशात्यजनवर्णनं | .... ७० |
| कुटुंबत्यजनवर्णनं | .... ७१ |
| कर्महननवर्णनं | .... ७२ |
| चतस्रोभावनाकरणवर्णनं | .... ७४ |
| महामंत्रजपवर्णनं | .... ७५ |
| धर्मोपधकरणवर्णनं | .... ७६ |
| धर्मशरणकरणवर्णनं | .... ७८ |

| विषय | पृष्ठ | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|
| १ | २ | १ | २ |
| एकत्वचिंतनवर्णनं | ....७९ | सप्तव्यसनत्यागवर्णनं | ....८८ |
| अनित्यभावनावर्णनं | ....८१ | योग्याचरणवर्णनं | ....९३ |
| धर्मसंवलकरणवर्णनं | ....८४ | तात्पर्यवर्णनं | ....९५ |
| मानुष्यदुर्लभत्ववर्णनं | ....८५ | | |


## सुभाषितावलीचें शुद्धिपत्र.

| पृ. | पं. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २० | १८ | तत्त्वमवद्धा | तत्त्वर्मवद्धा |
| २६ | १९ | स्वाद्यास्वाद्यं | स्वाद्यास्वाद्यं |
| २७ | २० | दूरी कार्या | दूरीकार्या |
| २९ | १ | रशुभोहि | रशुभो हि |
| ३४ | २० | स्वर्गार्गलोद्घाटिका | स्वर्गार्गलोद्घाटिका |
| ४७ | ६ | लक्ष्मी:स्वय | लक्ष्मी: स्वय |
| ४३ | २५ | जिनद्राणां | जिनेंद्राणां |
| ६४ | ९ | परिषहसहं | परीषहसहं |
| ७० | १० | नि:संग: | नि:संग |
| ८० | ४ | त्यत्ता | त्यक्त्वा |
| ,, | ,, | रोगातो | रोगार्ता |

॥ श्रीः ॥

# अथ सुभाषितावली प्रारभ्यते।

जिनाधीशं नमस्कृत्य संसाराम्बुधितारकं ॥ स्वान्य
स्य हितमुद्दिश्य वक्ष्ये सद्भाषितावलीम् ॥ १ ॥ ॥

म० अर्थ–संसाररूप समुद्रांत तारणाऱ्या जिनेश्वरास नमस्कार करून आपलें व दुसऱ्याचें कल्याण व्हावें, असें मनांत आणून, सद्भाषितावली नांवाचें उपदेशपर वर्णन करितों.

हिं० अर्थ–संसाररूप समुद्रमें तारनेवाले जिनेश्वरको नमस्कार करके सद्भाषितावली नामक उपदेशपर वर्णन करता हूं.

॥ अथ पीठिका ॥ धर्मं त्वं कुरु दुस्त्यजं त्यज महापापं
बुधैर्निंदितं ॥ सम्यक्त्वं भज शर्मदं त्यज महामिथ्या-
त्वमूलं च वै ॥ सच्छास्त्रं पठ वृत्तमाचर जयं पंचेंद्रि-
याणां च भो ॥ नारीसंगमपि स्वयं त्यज महा कामं
कलंकास्पदं ॥ २ ॥ ॥ ॥ ॥ ॥

म० अर्थ–तूं धर्म कर, ज्ञात्यांनीं निंदिलेलें न सुटणारें मोठें पातक सोड, सुखकारक सम्यक्त्व धर, मिथ्यात्वाचें मूळ सोड, चांगलें शास्त्र वाच, चारित्र सांभाळ, अरे पंचेंद्रियें आपले स्वाधीन ठेव, स्वतः स्त्रीसंग देखील सोड, दुर्लौकिक करणारी अतिशय विषयप्रीति सोड.

हिं० अर्थ–तूं धर्म कर, ज्ञाते लोगोंने जिसकी निंदा की है और जो छूटना मुष्कल है उस बडे पातकको छोड दे, सुखदायक सम्यक्त्वको धारण कर, मिथ्यात्वका मूळ छोड दे, अच्छा शास्त्र पढ, चारित्रको संभाल, अय (भाई) पंचेंद्रियोंको अपने स्वाधीन रख, स्वतः स्त्रीसंगभी छोड दे, और बदनाम करनेवाले अति विषयप्रीतीको छोड दे.

दृष्ट्वा स्त्रीसुशरीररूपमतुलं मध्ये विचारं कुरु ॥
श्रीतीर्थेश्वरपादसत्कमलयोः सेवां सदा सद्गुरोः ॥
बाह्याभ्यंतर सत्तपः कुरु सदा जिव्हां वशं चानय ॥
भ्रातस्त्वं त्यज कोपमानसहितान् सर्वान्कषायांश्च वै १

म० अर्थ—अतिशय सुंदर स्त्रियेचें आंग नजरेस पडलें, तरी त्यांत काय काय नासके कुसके पदार्थ भरले आहेत, ह्याचा विचार कर; नेहमीं सद्गुरूच्या व तीर्थंकराच्या चरणकमलांची सेवा कर; बाह्य व अभ्यन्तर नांवाचें चांगलें तप कर; जीभ नेहमीं स्वाधीन ठेव; बंधो! तूं क्रोध, मान, माया, लोभ वगैरे सगळे कषाय सोड.

हिं० अर्थ—अति रूपवती स्त्रीका शरीर देखके उसमें क्या क्या सडेल व बदबूके पदार्थ भरेहुए हैं इसका विचार कर; हमेषा सद्गुरू और तीर्थंकरके चरणकमलकी सेवा कर; बाह्य और अभ्यंतर नामक अच्छे तपका आचरण कर; निरंतर जिव्हाको स्वाधीन रख दे; अय भाई! तूं क्रोध, मान, माया, लोभ वगैरा सब कषायोंको छोड दे.

सर्वेषु जीवेषु दयां कुरुध्वं । सत्यं वचो ब्रूहि धनं परेषां ॥ चाब्रह्मसेवां त्यज सर्वकालं । परिग्रहं मुंच कुयोनि बीजं ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥ ॥

म० अर्थ—सर्व प्राणीमात्रांवर दया कर; खरें बोल; दुसऱ्यांचें द्रव्य व विषयसुखाची इच्छा सोड; वाईट गाते देण्यास मूळ असा परिग्रह सोड.

हिं० अर्थ—सब प्राणीमात्रपर दया कर; सत्य बोला कर, सर्व काल दुसरोंके द्रव्य और विषयसुखकी इच्छा छोडदे; दुर्गतीका मूळ जो परिग्रह उसका त्याग कर.

वैराग्यसारं भज सर्वकालं । निर्ग्रंथवाक्यं कुरु मुक्तिबीजं ॥ विमुंच संगं कुजनेषु मित्र । देवार्चनं त्वं कुरु भावयुक्तः ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥

म० अर्थ—नेहमीं वैराग्यरूप चांगली वस्तु घे; मोक्षास कारण असें निर्ग्रंथ मुनीचें वाक्य मान; मित्रा! वाईट लोकांचा सहवास सोड; व भक्तिभावानें देवांचें पूजन कर.

हिं० अर्थ—निरंतर वैराग्यरूप अच्छी वस्तु ले; मोक्षका बीज जो निर्ग्रंथ मुनीका वाक्य उसको मान ले; हे मित्र! दुर्जनका सहवास छोड दे; और भक्तिभावसे देवका पूजन कर.

दानं त्वं कुरु भावतःसुमुनये चैत्यालये भावनां।रात्रौ भोजनवर्जनं त्यज महागार्हस्थभावं सुहृत्॥ देहं त्वं त्यज भोग सारमपि च संसारपारं व्रज । धीरत्वं कुरु मुंच शोकमशुभं शौचं च सत्यं वद ॥ ६ ॥ ॥

म० अर्थ-तूं भक्तीनें मुनीश्वरास दान दे; जिनमंदिरांत भावना कर; रात्रीं भोजन करूं नको; मित्रा ! खरेपणानें संसार कर; विलासाला योग्य शरीर असलें, तरी तें तुच्छ मान; संसार चुकीव; धैर्य धर; अमंगल शोक सोडून दे; शुद्धता धर; खरें बोल.

हिं० अर्थ-तू भक्तिभावसें मुनीश्वरको दान धर्म कर; जिनमंदिरमें भावना कर; रातको भोजन मतकर; मित्र! सचाईसे संसार कर; शरीरको अगरचे वह विलासके योग्य होवे तुच्छ मान; संसारको टाल दे; धैर्य धर; अमंगल शोक छोड दे; शुद्धता धारण कर; सच बोला कर.

त्वं निस्सारमवेहि देहमखिलं धृत्वा व्रतं मा त्यज ।
सन्यासे मरणं च भोगविषये चास्थामिहामुत्र न ॥
माध्यस्थं हितमेव जाप्यजपनं रोगस्य निनाशनं ।
जीवित्वं तरलं तथाच विभवं मत्वा विवेकं भज ॥ ७ ॥

म० अर्थ-तूं सर्व देह तुच्छ आहे असें मान; घेतलेलें व्रत सोडूं नको; सन्यासविधीनें मरण साध; इहलोकीं व परलोकीं ही विषय-सुखाची आवड नको; समता भाव हितकर आहे, जपजाप्य रोग घालविणारें आहे,आयुष्य व संपत्ति चंचल आहे,असें जाणून विचार कर.

हिं० अर्थ-तू सर्व देह तुच्छ है, ऐसा मान; लियाहुवा व्रत मत छोड; सन्यासविधीसे मरण साध ले; इहलोक व परलोकमेंभी विषयसुखकी इच्छा न चाहिये; समता भाव हितकर है; जपजाप्य रोगनाशक है; और आयुष्य व संपत्ति चंचल है, ऐसा जानके विचार कर.

सत्वरं कुरु वै धर्मं मानुष्यं दुर्लभं भवेत् ॥ अयोग्यं च परित्यज्य योग्यामुक्ति त्वमाचर ॥ ८ ॥ ॥

म० अर्थ—धर्मकृत्य लवकर कर, कां तर मनुष्यपणा (मनुष्यजन्म) दुर्मिळ आहे; अयोग्य कृत्य सोडून योग्य रीतीच्या उपदेशाप्रमाणें वर्तन कर.

हिं० अर्थ—धर्म कृत्य जल्द कर, क्यौं के मनुष्यपना (मनुष्यजन्म) दुर्मिळ है; अयोग्य कृत्य छोडकर योग्य उपदेशानुसार वर्तन रख. ॥इति पीठिका॥

॥ धर्मं कुरु ॥ धर्मं करोति यो नित्यं स पूज्य स्त्रिदशे-
श्वरैः ॥ लक्ष्मीस्तं स्वयमायाति भुवन त्रयसंस्थिता ॥९॥

म० अर्थ—जो नित्य धर्म करितो, तो मनुष्य देवादिकांसही पूज्य होतो; त्रैलोक्यांत असणारी संपत्ति त्याला आपाप मिळते.

हिं० अर्थ—जो नित्य धर्म करता है, वह मनुष्य देवादिककोंभी पूज्य होताहै; त्रैलोक्यमेंकी संपत्ति उसको खुदबखुद मिलती है.

संसारेऽत्र कुलान्वितं कुकुलजाः श्रीवल्लभं दुर्भगा
दातारं कृपणा मुनिं खलजनाःपुत्रान्वितं निःसुताः॥
वैरूप्योपहताश्च कांतवपुषं धर्माश्रितं पापिनो
नानाशास्त्रविचक्षणं च पुरुषं निंदंति मूर्खा नराः १०

म० अर्थ—ह्या संसारांत सुकुलीनास कुकुलीन, श्रीमंतास दरिद्री, उदार स्वभावाचे दात्यास कृपण लोक, मुनीश्वरास दुष्ट लोक, संतति असणाऱ्यास निपुत्रिक, सुंदर स्वरूपाचे मनुष्यास कुरूप, धार्मिकास पातकी लोक, नानाप्रकारचीं शास्त्रें शिकलेल्या पुरुषास मूर्ख लोक निंदितात.

हिं० अर्थ—इस संसारमें सुकुलीनकी कुकुलीन, श्रीमंतकी दरिद्री, उदार स्वभावके दाताकी कृपण लोग, मुनीश्वरकी दुष्ट लोग, संततिवालोंकी निपुत्रिक, सुंदर स्वरूपवान मनुष्यकी कुरूप, धार्मिककी पातकी लोग, नानाप्रकारके शास्त्र सीखेहुए पुरुषकी मूर्ख लोग निंदा करते है.

कालः संप्रति वर्तते कलियुगे सत्या नरा दुर्लभा
देशाश्च प्रलयं गताः करभरैर्लोभंगताः पार्थिवाः॥

**नानाचौरगणा लुषंति पृथिवीमार्यो जनो क्षीयते**
**पुत्रस्यापि न विश्वसंति पितरः कष्टं युगं वर्तते॥ ११॥**

म० अर्थ—आतां कलियुगांत असा वेळ आहे कीं, खरीं माणसें दुर्मिळ झालीं; देश उद्वस्त झाले; राजे लोकांस कर ज्यास्त वाढविण्याची आशा सुटली; अनेक प्रकारच्या चोरांचे समुदाय पृथ्वीस लुटूं लागले; विद्वान् लोक अल्पायुष झाला; प्रत्यक्ष मुलावर आईबाप देखील विश्वास ठेवीतनासे झाले; सारांश, हें कलियुग त्रासदायक खरें!

हिं० अर्थ—अब कलियुगमें ऐसा समय है के सच्चे आदमी दुर्मिळ हो गए, राजाओंको करभार जियादा बढानेकी आशा उत्पन्न हुई है; अनेक प्रकारके चोरोंके समुदाय पृथ्वीको लुटने लगे; विद्वान् लोग अल्पायुष हो रहे; प्रत्यक्ष पुत्रपरभी मांबाप विश्वास नहीं रखते; सारांश, यह कलियुग त्रासदायक है.

**सर्वौषधीनामशनं प्रधानं। सर्वेषु पेयेषु जलं प्रधानं॥**
**निद्रा सुखानां प्रमदा रतीनां । सर्वेषु गात्रेषु**
**शिरः प्रधानं ॥ १२ ॥ ॥ ॥ ॥ ॥**

म० अर्थ—सर्व प्रकारच्या औषधांत अन्न मुख्य आहे; सर्व प्रकारच्या पिण्याचे पदार्थांत पाणी मुख्य आहे; सर्व प्रकारच्या सुखांत झोंपेचें सुख मुख्य आहे; सर्व प्रकारच्या प्रीतींत स्त्रीची प्रीति मुख्य आहे; सर्व अवयवांत मस्तक मुख्य आहे.

हिं० अर्थ—सर्व प्रकारके औषधोंमें अन्न मुख्य है; सर्व प्रकारके पेय पदार्थोंमें जल मुख्य है; सर्व प्रकारके सुखोंमें निद्रासुख मुख्य है; सर्व प्रीतीमें स्त्रीकी प्रीति मुख्य है; और सर्व अवयवोंमें मस्तक मुख्य है.

**तीर्थंकरा गणधरास्त्रिदशाधिनाथा श्चक्रेश्वरा**
**मुशलिनो हरयः क्षमेशाः ॥ के के समृद्ध विभवा**
**बलशालिनोऽपिकालेन हंत हृत केन नु संन्हियंते॥ १३॥**

म० अर्थ—तीर्थंकर, गणधर, देवेंद्र, चक्री, बलदेव, वासुदेव, राजे

असे कितीएक मोठे धनवान् व बलिष्ठ होते; तरी त्यांस दुष्ट यमानें नेलें; बरें सारांश यम सर्वापेक्षां बलिष्ठ होय.

हिं० अर्थ–तीर्थंकर, गणधर, देवेंद्र, चक्री, बलदेव, वासुदेव, राज वगैरा कितनेक बडे बडे धनवान् और बलिष्ठ थे, तो भी क्या उनको दुष्टयम नहीं लेगया? सारांश यम सबसे बलिष्ठ है.

नो विद्या न च भेषजं न च पिता नो बांधवा नो सुताः ॥ नाभीष्टाः कुलदेवता न जननी स्नेहानुबंधा न्विताः ॥नार्थो न स्वजनो न वा परिजनः शारीरकं नो बलं नो शक्ताः त्रुटितं सुरासुरवरैः संधातुमायुर्ध्रुवं ॥ १४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

म० अर्थ–आयुष्य तुटलें (संपलें,) तर विद्या उपयोगीं पडत नाहीं; औषध उपयोगीं पडत नाहीं; पिता उपयोगीं पडत नाहीं; नातलग उपयोगीं पडत नाहींत; पुत्र उपयोगीं पडत नाहींत; इष्टदेवता उपयोगीं पडत नाहींत; मायाळू स्वभावाची माता उपयोगीं पडत नाहीं; द्रव्य उपयोगीं पडत नाहीं; स्वजन उपयोगीं पडत नाहीं; चाकरमाणसें उपयोगीं पडत नाहींत; अंगातील सामर्थ्य उपयोगीं पडत नाहीं; फार काय? परंतु देवदैत्याला ही खरोखर तुटलेलें आयुष्य सांधतां येत नाहीं!

हिं० अर्थ–आयुष्य तमाम होनेपर विद्या काम नहीं आती; दवा कार आमद नहीं होती; पिता उपयोगी नहीं पडता; बिरादरीवाले काम नहीं आते; पुत्र निरुपयोगी होते हैं; इष्ट देवता एं फायदा नहीं पौंहचातीं; स्नेहवती मातासे कुछ उपयोग नहीं होता; द्रव्य बेकार होता है; स्वजन व नौकर कुछ उपयोगी नहीं होते; शरीरबल काम नहीं आता; जियादा क्या कहें, वास्तविक देव दैत्यभी तूटेहुए आयुष्यको जोड नहीं सकते!

न ब्रह्मा नेंदुमौलिः शशधरतपनौ नापि नारायणोसौ नाप्यष्टौ लोकपालाः सुरपतिरथवा नापि बुद्धो

नवाऽर्हन् ॥ नाकृष्टं कालपाशैर्जनमनुदिवसं नीयमानं वराकं व्याघ्राघातं वनांतात्पशुमिव विवशं त्रातु-मेते न शक्ताः ॥ १५ ॥ ॥ ॥ ॥ ॥

म० अर्थ—घोर अरण्यांत वाघाचे तावडींत सांपडलेल्या निर्बल पशू-प्रमाणें यमाचे पाशांनीं दररोज ओढलेल्या क्षुद्र जीवास रक्षण कर-ण्यास ब्रह्मदेव समर्थ नाहीं, शंकर समर्थ नाहीं, सूर्य चंद्र समर्थ नाहींत, हा विष्णु देखील समर्थ नाहीं, आठ लोकपाल समर्थ नाहींत, इंद्र समर्थ नाहीं, बुद्ध समर्थ नाहीं, किंवा अर्हन् समर्थ नाहीं.

हिं० अर्थ—निबिड अरण्यमें शेरके पंजेमें गटे हुए निर्बल पशुके मुवाफक यमपाशसे हररोज खींचे हुए क्षुद्रजंतुओंका रक्षण करनेको ब्रह्मदेव, शंकर, चंद्र, सूर्य, वह विष्णु, अष्टलोकपाळ, इंद्र, बुद्ध, वा अर्हन् भी समर्थनहीं है!

लंकेशः क्व केशवः क्व नलः क्वासौ क्व ते पाण्डवाः क्वासौ दाशरथी क्व तत्कुरुशतं ते चक्रिचक्रा-युधाः ॥ नाभेयप्रमुखाः क्व ते जिनवृषाः सत्सर्वसा-धारणं नन्वेतन्मरणं न तत्र शरणं किंचित् कचि-त् कस्यचित् ॥ १६ ॥ ॥ ॥ ॥ ॥

म० अर्थ—रावण कोणीकडे? कृष्ण कोणीकडे? हा नैषधपति (नल) कोणीकडे? ते पांडव कोणीकडे? हा दाशरथी राम कोणीकडे? तें दुर्योधनादिक शंभर बंधु कोणीकडे? चक्री अर्धचक्री कोणीकडे? ऋषभनाथ वगैरे जिनेश्वर कोणीकडे? सारांश, मरण हें सर्वांस लागलेंच आहे; त्यावेळीं कोणाला कधींही कोणी सांभाळणारा नाहीं.

हिं अर्थ—रावण कहां? कृष्ण कहां? यह नैषधपति नळ कहां? वह पांडव कहां? यह दाशरथी राम कहां? वह दुर्योधनादिक सौ बंधु कहां? चक्री अर्ध चक्री कहां? ऋषभनाथवगैरा जिनेश्वर कहां? सारांश, मरण सबके पीछे लगाहुवा है; उसवक्त कोई किसीको संभाळनेवाला नहीं!

**गर्भस्थं जातमात्रं शयनतलगतं मातुरुत्संगसंस्थं**
**बालं वृद्धं युवानं गुणिनमगुणिनं विश्वपालं खलार्यं॥**
**वृक्षाग्रे शैलशृंगे नभसि पथि जले पिंजरे कोटरे वा**
**पाताले वाप्रविष्टं हरति हि सततो दुर्निवार्यःकृतांतः १७**

म० अर्थ—गर्भांत असतांच, जन्मतांच, हातरुणावर निजलें असतां, आईच्या मांडीवर असणाऱ्या मुलास, वृद्ध मनुष्यास, तरुण मनुष्यास गुणवानास, गुणहीनास, राजास, दुष्टास, श्रेष्ठास, झाडाचे शेंड्यावर, पर्वताचे शिखरावर, आकाशांत, मार्गांत, जलांत, पिंजऱ्यांत, कोठ्यांत किंवा पाताळांत शिरलें, तरी तेथून यम ओढून नेतो. सारांश, यम चुकवितां येत नाहीं!

हिं० अर्थ—गर्भमें होतेही, पैदा होतेही, बिछानेपर सोनेके हालतमें, मांके गोदमें बैठेहुए बच्चेको, वृद्धमनुष्यको, तरुण मनुष्यको, गुणवान्को, गुणहीनको, राजाको, दुष्टको और श्रेष्ठकोभी, वृक्षके अग्रभागपर, पर्वतके सिखर पर, आकाशमें, रास्तेमें, जलमें, पिंजरेमें, गांठमें, व पातालमें गए तोभी वहांसे यम खींच ले जाताहै. सारांश यमको टालना मुष्कल है!

**धर्मयुक्तस्य जीवस्य भृत्यः कल्पद्रुमो भवेत् ॥ चिंता**
**मणिः कर्मकरः कामधेनुश्च किंकरी ॥ १८ ॥ ॥**

म० अर्थ—धार्मिक मनुष्याचा कल्पवृक्ष चाकर आहे; चिंतामणि रत्न घरचा गडी असून, कामधेनु दासी होय.

हिं० अर्थ—धार्मिक मनुष्यका कल्पवृक्ष नौकर है; चिंतामणीरत्न सेवक, और कामधेनु दासी है.

**धर्मेण पुत्रपौत्रादि सर्वं संपद्यते नृणां ॥ गृहवाहन**
**वस्तूनि राज्यालंकरणानि च ॥ १९ ॥ ॥ ॥**

म० अर्थ—धर्मामुळें मनुष्यांस पुत्र, पौत्र, गृह, वाहन, वस्तु, राज्य, अलंकार वगैरे सर्व कांहीं मिळतें.

हिं० अर्थ—धर्मसे मनुष्यको पुत्र, पौत्र, गृह, वाहन, वस्तु, राज्य, अलंकार वगैरा सब कुछ मिलता है.

**वरं मुहूर्त्तमेकं तु धर्मयुक्तस्य जीवितं ॥ तद्धीनस्य वृथा वर्षकोटाकोटि विशेषतः ॥ २० ॥ ॥ ॥**

म० अर्थ—धार्मिक मनुष्याचें एक मुहूर्ताचें आयुष्य बरें; परंतु, पातकी मनुष्याचें कोट्यावधि वर्षांपेक्षां ज्यास्त असलें तरी व्यर्थ होय.

हिं० अर्थ—धार्मिक मनुष्यका एक मुहूर्तमात्रका जीवितभी बेहत्तर है; परंतु, पातकी मनुष्यका कोट्यवधी वर्षसे जियादा जिवित हो तोभी वह व्यर्थ है.

**यमदमशमजातं सर्वकल्याणबीजं सुगतिगमनहेतुं तीर्थनाथैः प्रणीतं ॥ भवजलनिधिपोतं सारपाथेयमुच्चैः गृहमतुलसुखानां धर्ममाराधय त्वं ॥ २१ ॥**

म० अर्थ—यम, नियम, शांति ह्यांपासून उत्पन्न होणाऱ्या धर्माचा तूं अंगिकार कर; धर्म हा सर्व कल्याणांचें मूळ आहे; मोक्षसाधनास कारण आहे; तीर्थंकरांनीं आचारिलेला आहे; संसारसमुद्रांत नौका आहे; मोठें उत्तम प्रकारचें फराळाचें आहे; अमर्याद सुखाचें घर आहे.

हिं० अर्थ—यम, नियम, और शांतीसे उत्पन्न होनेवाले धर्मका तू अंगिकार कर; धर्म सब कल्याणकी जड है; मोक्षसाधनको कारण है, तीर्थंकरोंने कहाहुवा है; संसारसमुद्रमें नौका है; उत्तम प्रकारका तोपा है; और अनंत सुखका स्थान है! ॥ **इति धर्म वर्णनं ॥**

**पाप वर्णनं ॥ पापं शत्रुं परं विद्धि श्वभ्रतिर्यग्गतिप्रदं ॥ रोगक्लेशादि भाण्डारं सत्यं दुःखाकरं नृणां ॥ २२ ॥**

म० अर्थ—पातक हें मोठें वैरी आहे असें जाण; हें नरकगतीस व पशुगतीस नेतें; रोगांचें व दुःखांचें भांडार आहे; व मनुष्यांस खरोखर दुःखदायक आहे.

हिं० अर्थ—पातक यह बडा शत्रु है ऐसा जान ले; यह नरकगति व

पशुगतीको लेजाता है; रोग और दुःखका भांडार है; और वास्तविक मनुष्योंको दुःखदायक है.

**जीवन्तोपि मृता ज्ञेया धर्महीनाहि मानवाः ॥ मृता धर्मेण संयुक्ता इहामुत्रच जीविताः ॥ २३ ॥ ॥**

म० अर्थ—पापी मनुष्यें जीवंत असलीं, तरी तीं मृताप्रमाणेंच आहेत; धार्मिक मनुष्य मरण पावले तरी ते इहलोकीं व परलोकीं जीवंतच आहेत.

हिं० अर्थ—पापी मनुष्य जीवंत हों तोभी वह मृतवत् हैं; और धार्मिक मनुष्य मरजाय तोभी वह इहलोक व परलोकमें जीवंत हैं.

**पापयुक्तस्य नास्त्यत्र धनधान्य गृहादिकं ॥ वस्त्रालंकारसद्वस्तु दुःखक्लेशानि संति च ॥ २४ ॥ ॥**

म० अर्थ—पातकी मनुष्यास ह्या लोकीं द्रव्य, धान्य, घर, वस्त्र, अलंकार इत्यादिक चांगल्या वस्तु मिळत नाहींत, दुःख व कष्ट मात्र होतात.

हिं० अर्थ—पातकी मनुष्यको इस लोकमें धन, धान्य, गृह, वस्त्र, अलंकार, वगैरा अच्छी वस्तुएं नहीं मिलतीं; दुःख और कष्ट मात्र होते हैं.

**मित्रशत्रूच विज्ञेयौ पुण्यपापे शरीरिणां ॥ जीवेन व्रजतः सार्धं सुखदुःखफलप्रदौ ॥ २५ ॥ ॥**

म० अर्थ—प्राणीमात्रांनें पुण्य व पाप अनुक्रमें मित्र व शत्रु जाणावे; ते जीवाबरोबर सुख व दुःख हीं फळें देत जातात. पुण्यापासून सुख होतें, पातका पासून दुःख होतें.

हिं० अर्थ—प्राणीमात्रोंके पुण्य व पाप अनुक्रमसे मित्र और शत्रु हैं ऐसा समझो. वह जीवको सुख और दुःखके फल देते हैं.

**सकल भवनिदानं रोगशोकादि बीजं ॥ नरकगमन हेतुं सर्व दारिद्र्यमूलं ॥ इहपरभवशत्रुं दुःखदानैकदक्षं ॥ त्यज मुनिजननिंद्यं पापकृत्यं समस्तं ॥२६॥**

म० अर्थ–पातक संसाराचें मूळ आहे; रोग दुःखादिकांचें बीज आहे; नरकास जाण्यास कारण आहे; अठरा विश्वे दारिद्य येण्याचें मूल आहे; ह्या लोकीं व परलोकीं शत्रु आहे; दुःख देण्यास सर्वदा तयार आहे; मुनीश्वर त्याची संगत धरीत नाहींत; त्या सर्व प्रकारच्या पातकांचा त्याग कर.

हिं० अर्थ–पातक संसारको कारण होता है; रोग और दुःखादिकका बीज है; नरकजानेको कारण होता है; सर्व दारिद्यका मूल है; इहलोक व परलोकमें शत्रु है; हमेषा दुःख देनेको तयार होना है; मुनिजन जिसकी निंदा करते हैं ऐसे समस्त पातकका त्याग कर. ॥ २६ ॥ पापं त्यज ॥

सम्यक्त्ववर्णनं ॥ सम्यग्दर्शनसंशुद्धं सत्यमानुच्यते बुधैः ॥ सम्यक्त्वेन विना जीवःपशुरेव न संशयः॥ २७॥

म० अर्थ–सम्यग्दर्शनानें शुद्ध असणाऱ्या जीवास ज्ञाते सत्यमान् ( खरा ) ह्मणतात; सम्यक्त्वाखेरीज जीव शुद्ध जनावराप्रमाणें आहे.

हिं० अर्थ–सम्यग्दर्शनसे शुद्ध भये हुए प्राणीको ज्ञाते लोग सत्यमान् ( सच्चा ) कहते हैं; विना सम्यक्त्वके जीव पशुवत् है, इसमें संदेह नहीं.

सम्यक्त्वं यस्य जीवस्य हस्ते चिंतामणिर्भवेत् ॥
कल्पवृक्षो गृहे तस्य कामगव्यनुगामिनी ॥ २८ ॥

म० अर्थ–ज्या प्राण्याचे हातीं सम्यक्त्वरूप चिंतामणीरत्न आहे, त्याला कल्पवृक्ष घरीं असलेल्या सारखा व कामधेनु पावलेल्या गाईसारखी आहे.

हिं० अर्थ–सम्यक्त्वधारी जीवके हातमें चिंतामणिरत्न, और मकानमें कल्पवृक्ष होता है; और कामधेनु उसके पीछे पीछे आती है.

सम्यक्त्वालंकृतो यस्तु मुक्तिस्त्री तं वरिष्यति ॥
स्वर्गश्रीः स्वयमायाति राजलक्ष्मीः सखी भवेत्॥२९॥

म० अर्थ–जो मनुष्य सम्यक्त्वानें सुशोभित आहे, त्याला मुक्तिरूप स्त्री वरिते; स्वर्गसंपत्ति आपाप मिळते; राजसुख मित्राप्रमाणें होतें.

**हिं० अर्थ**—जो मनुष्य सम्यक्त्वसे सुशोभित हो, उसको मुक्तिरूप स्त्री परणती है; स्वर्गसंपत्ति खुदबखुद मिलती है; और राज्यलक्ष्मी सखी होती है.

**यत्र कुत्राऽपि सद्दृष्टिः पूज्यः स्याद्भुवनैरपि ॥ सम्यक्त्वेन विना साधुर्निंदनीयः पदे पदे ॥ ३० ॥ ॥**

**म० अर्थ**—जेथें कोठें ही सदाचारी मनुष्य असेल, तो त्रिभुवनास पूज्य होईल. साधु असून तो सम्यक्त्वधारी नसेल, तर तो पावलोपावलीं निंदा करण्यास योग्य आहे.

**हिं० अर्थ**—सदाचारी मनुष्य कहींभी हो, वह त्रिभुवनको पूज्य होगा; साधु होकर सम्यक्त्वधारी न हो, तो वह सर्वत्र निंद्य होगा.

**सकलसुखनिधानं धर्मवृक्षस्य मूलं ॥ जननजलधिपोतं भव्यसत्त्वैकपात्रं ॥ दुरिततरुकुठारं ज्ञानचारित्रमूलं ॥ गतसकल कुधर्मं दर्शनं त्वं भजस्व ॥ ३१ ॥**

**म० अर्थ**—सम्यक्त्व हें सर्व सुखाचें भांडार आहे; धर्मरूप वृक्षाची मुळी आहे; संसारसमुद्रांतील नौका आहे; भव्य जीवांचें मुख्य द्रव्य आहे; पातकवृक्षावर कुऱ्हाड आहे; ज्ञानाचें व चारित्राचें मूळ आहे' ज्यांत कुधर्माचा लेश देखील नाहीं, अशा सम्यक्त्वाचा तूं स्वीकार कर.

**हिं० अर्थ**—सम्यक्त्व सर्व सुखोंका भांडार है; धर्मरूप वृक्षकी जड है; संसारसमुद्रमें नोका है; भव्यजीवोंका मुख्य द्रव्य है; पातकरूप वृक्षके वास्ते कुऱ्हाडी है. जिसमें कुधर्मका लेशभी नहीं, ऐसा ज्ञान और चारित्रका मूळ जो दर्शन उसका तू स्विकार कर. ॥ ३१ ॥ **इति सम्यक्त्ववर्णनं ॥**

**अथ मिथ्यात्ववर्णनं ॥ मिथ्यात्वेन भृतो जीवो सद्धर्मं नाभिमन्यते ॥ ज्वरीव शर्करादुग्धं कुधर्मं मन्यते पुनः ३२**

**म० अर्थ**—मिथ्यात्वी प्राणी असला तर, आजारी मनुष्यास जसी दुध व साखर आवडत नाहीं, तसा त्यास चांगला धर्म आवडत नाहीं; कुधर्म मात्र त्यास आवडतो.

हिं० अर्थ–मिथ्यात्वी प्राणी हो, तो उसको सद्धर्म पसंद नहीं आता; जैसा बीमारको दूध और शक्कर पसंद आती है, वैसाही उसको कुधर्म मात्र पसंद होता है.

**मिथ्यात्वसदृशं पापं सम्यक्त्वेन समं वृषं ॥**
**न भूतं भुवने चापि नास्ति नाग्रे भविष्यति ॥ ३३॥**

म० अर्थ–( जगांत ) मिथ्यात्वा सारखें पाप, सम्यक्त्वा सारखें पुण्य झालें नाहीं, सध्या नाहीं व पुढेंही होणार नाहीं.

हिं० अर्थ–मिथ्यात्वके मुवाफक पातक और सम्यक्त्वके मुवाफक पुण्य इस जगतमें आगे हुवा नहीं, अब मौजूद नहीं, और आयंदाभी नहीं होगा.

**नीच देवरतो जीवो मूढः कुगुरुसेवकः ॥ कुज्ञानत-**
**पसा युक्तः कुधर्मात्कुगतिं व्रजेत् ॥ ३४ ॥ ॥**

म० अर्थ–नीच देवास भजणारा, नीच गुरुची भक्ति करणारा, कुज्ञानानें कुतपश्चर्या करणारा जीव कुधर्मामुळें नरकास जातो.

हिं० अर्थ–नीच देवको भजनेवाला, कुगुरुकी सेवा करनेवाला, कुज्ञानकी तपश्चर्या करनेवाला मुढ जीव कुधर्मसे नरकको जाता है.

**वरं सर्पमुखे वासो वरंच विषभक्षणं ॥ अचलाग्नि-**
**जले पातो मिथ्यात्वान्न च जीवितं ॥ ३५ ॥ ॥**

म० अर्थ–सापाचे तोंडांत राहणें बरें, विष खाणें बरें, पर्वतावरून खालीं, अग्नींत, पाण्यांत उडी टाकून आत्मघात केलेला बरा, परंतु मिथ्यात्वानें जीवंत राहणें नको.

हिं० अर्थ–सर्पके मुखमें रहना बेहतर, विष सेवन करना बहेतर, पर्वतसे नीचे, अग्नीमें और जलमें कुदकर आत्मघात करना बेहतर, लेकिन मिथ्यात्वयुक्त जीवंत रहना न चाहिये.

**सकलदुरितमूलं दुःखवृक्षस्य बीजं नरकगृहनिवेशं**
**स्वर्गमोक्षैक शत्रुं ॥ त्रिभुवनपतिनिंद्यं मूढलोकै**
**र्गृहीतं त्यज सकलमसारं त्वं च मिथ्यात्वकृत्यं ॥ ३६॥**

म० अर्थ–मिथ्यात्व सर्व प्रकारच्या पातकांस कारण आहे; दुःख-रूप वृक्षाची मूळी आहे; नरकगृहाचा रस्ता आहे; स्वर्ग व मोक्ष यांचा शत्रु आहे; त्रैलोक्यपति जिनेश्वरांनीं जें निंदिलेलें आहे, मूर्ख लोकांनीं आदरिलेलें आहे, अशा ह्या सर्व असार मिथ्यात्वास सोडून दे.

हिं० अर्थ–जो सब पातकोंका मूळ है, दुःखरूप वृक्षकी जड है, नरक गृहका रास्ता है, स्वर्ग और मोक्षका शत्रु है, त्रैलोक्यपति जिनेंद्र जिसको निंद्य समजते है, मूर्खलोग जिसका अंगिकार करते हैं, उस सब असार मिथ्यात्वको छोड दे. ॥ ३६ ॥ इति मिथ्यात्ववर्णनं ॥

अथ ज्ञानवर्णनम् ॥ ज्ञानयुक्तो भवेज्जीवः स्वर्ग-श्रीमुक्तिवल्लभः ॥ ज्ञानहीनो भ्रमेन्नित्यं संसारे दुःखसागरे ॥ ३७ ॥ ॥ ॥ ॥ ॥

म० अर्थ–ज्ञानी जीव स्वर्गसुखाचा व मोक्षसुखाचा अनुभव घेतो; अज्ञानी मनुष्य नेहमीं दुःखाचा समुद्रच अशा संसारांत फिरत असतो.

हिं० अर्थ–ज्ञानी जीव स्वर्ग और मोक्षसुखका अनुभव लेता है; और अज्ञानी जीव हमेषा संसाररूप दुःख समुद्रमें फिरता है.

यत्राचरति स ज्ञानी नाज्ञानी तत्र वै चरेत् ॥ बध्यते कर्मभिर्यज्ञः ज्ञानी कर्मच्युतो भवेत् ॥ ३८ ॥ ॥

म० अर्थ–ज्ञानी जीव ज्या मार्गानें जातो, त्या मार्गानें अज्ञानी जात नाहीं. अज्ञानी कर्मबद्ध होतो. ज्ञानी कर्मातून मुक्त होतो.

हिं० अर्थ–ज्ञानी जीव जिस मार्गसे जाता है, उस मार्गसे अज्ञानी जीव नहीं जाता. अज्ञानी कर्मबद्ध होता है; और ज्ञानी कर्मसे मुक्त होता है.

ज्ञानाभ्यासपरो जीवस्त्रिगुप्तोंद्रियसंवरः ॥ भवेदे-काग्रचित्तस्तु तस्माद्ज्ञानं परं तपः ॥ ३९ ॥ ॥

म० अर्थ–ज्ञानाभ्यासांत निमग्न असणाऱ्या जीवाला तीन गुप्ति व इंद्रियें स्वाधीन ठेवितां येतात, व एकाग्रचित्त होतां येतें; त्या अर्थीं ज्ञान हेंच उत्कृष्ट तप आहे.

हिं० अर्थ—ज्ञानाभ्यासमें जो जीव निमग्न हो, वह तीन गुप्ती और इंद्रियोंको स्वाधीन रखसकता है; और एकाग्रचित्तभी होता है; पस ज्ञानही उत्कृष्ट तप है.

**ज्ञानहीनो न जानाति धर्मं पापं गुणागुणं ॥ हेयाहेयं विवेकं च जात्यन्ध इव हस्तिनं ॥ ४० ॥ ॥**

म० अर्थ—जन्मापासून आंधळा असणारा मनुष्य जसा हत्तीस जाणत नाहीं, तसा ज्ञानहीन मनुष्य धर्म, अधर्म, गुण, अवगुण, त्याज्य, ग्राह्य, विचार ह्यांस जाणत नाहीं.

हिं० अर्थ—जन्मांध मनुष्य जैसा हात्तीकों नही जानता, वैसाही ज्ञानहीन मनुष्य धर्म, अधर्म, गुण, अवगुण, त्याज्य, ग्राह्य व विचारको नही जानता.

**विमल गुणनिधानं विश्वविज्ञानबीजं ॥ जिनमुनि गणसेव्यं सर्वतत्वप्रदीपं ॥ दुरिततरुसमीरं पुण्यतीर्थं जिनोक्तं ॥मदगजपतिसिंहं ज्ञानमाराधय त्वं॥४१॥**

म० अर्थ—ज्ञान हें निर्दोष अशा गुणांचा ठेवा आहे; त्रैलोक्यांतील चातुर्याचें मूळ आहे; जिनेश्वरांच्या व मुनीश्वरांच्या समुदायानीं सेविलेलें आहे; सर्व प्रकारच्या तत्वांचा दीप आहे; पातकरूप वृक्षास वायु आहे; पवित्र तीर्थ आहे, असें जिनेश्वर सांगतात; अभिमानरूप हत्तीस सिंह आहे तें ज्ञान तूं संपादन कर.

हिं० अर्थ—ज्ञान निर्दोष गुणोंका निधान है; त्रैलोक्यके चातुर्यका मूल है; जिनेश्वर और मुनीश्वरोंके समुदायने जिसका अंगीकार किया है; सर्व प्रकारके तत्वोंका दिपक है; पातकरूप वृक्षको वायुसमान है; पवित्र तीर्थ है; जिनेश्वरनें कहा है; अभिमानरूप गजेंद्रके वास्ते सिंहतुल्य है; उस ज्ञानको तु संपादन करले. ॥ **इति ज्ञान वर्णनं** ॥

**अथ चारित्र वर्णनं ॥ जीवितव्यं वरं चैक दिनं वृत्तसमन्वितं ॥ ननु चारित्र हीनं हि वर्षकोटिशतं वृथा ॥ ४२ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥**

म० अर्थ—चारित्र पाळून एक दिवस जीवंत राहिलेलें चांगलें, परंतु चारित्रावांचून कोट्यावधि वर्षे जगलें तरी तें खरोखर व्यर्थ आहे.

हिं० अर्थ—चारित्र संभालके एक दिन जीवंत रहना बेहतर है, परंतु विना चारित्रके कोट्यवधिवर्षतक जिंदा रहना वास्तविक व्यर्थ है.

हीने संहनने जीवो यश्चारित्रं समाचरेत् ॥ उत्कृष्टा-
पेक्षया तस्य सहस्रगुणितं फलं ॥ ४३ ॥ ॥

म० अर्थ—शरीर अशक्त असूनही जो चांगले हेतूनें चारित्र पाळील, त्याला हजारपट ज्यास्त फळ मिळेल.

हिं० अर्थ—मनुष्य शक्तिहीन होते हुए उत्तम इच्छासे चारित्र पाले, तो उसको सहस्रगुणित फळ मिलेगा.

चारित्रासनमासीनो यद्यदंगी समीहते ॥ तत्तदेव
समायाति त्रैकाल्ये त्रिजगत्यपि ॥ ४४ ॥ ॥

म० अर्थ—सदाचार पाळून राहणारा प्राणी जें जें इच्छितो, तें तें त्यास त्रैलोक्यांत पाहिजे त्यावेळीं मिळतें.

हिं० अर्थ—चारित्रयुक्त मनुष्य जो जो चाहता है, वह वह उसको तीनों काळ व त्रिजगत्‌मेंभी प्राप्त होता है.

हीने संहनने दीक्षां वर्षमेकं दधाति यः ॥ सहस्र
वर्षचर्यायाः दीक्षातोप्यधिकं फलं ॥ ४५ ॥ ॥

म० अर्थ—शरीर अशक्त असूनही जो जीव एक वर्षपर्यंत दीक्षा पाळील, त्यास हजार वर्षे दीक्षा पाळल्याचें श्रेय आहे.

हिं० अर्थ—मनुष्य शक्तिहीन होते हुए एक वर्षतकही दीक्षा धारण करे, तो उसको हजार वर्षसेभी जियादा दीक्षा धारणकरनेका श्रेय मिलता है.

हीने संहनने धीराः ये कुर्वन्ति तपोनघं ॥ दिगंबर-
त्वमासाद्य ते धन्या मुनिनिर्मताः ॥ ४६ ॥ ॥

म० अर्थ—शरीर अशक्त असूनही जे धैर्यवान जिनदीक्षा घेऊन निष्पाप तपश्चर्या करितात, त्यांस मुनीश्वर धन्य मानितात.

हिं० अर्थ—शरीर निर्बल होकर भी जो धीर पुरुष जिनदीक्षा गृहण करके निष्पाप तपश्चर्या करते है, उनको मुनीश्वर धन्य मानते है.

# सद्भाषितावलीचें शुद्धिपत्र.

ह्या सद्भाषितावलीचे २ फार्म ह्मणजे १६ पृष्ठें बेळगांव येथील "रामतत्व" छापखान्यांत छापलीं, त्यांतील अशुद्ध त्याच्याच शेवटीं ह्मणजे १७ वे पृष्ठांत जोडिलें आहे.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | १४ | महा कामं | महाकामं |
| ,, | २७ | म्यंतर सत्तपः | म्यंतरसत्तपः |
| ,, | २८ | कषांयाश्च | कषायांश्च |
| २ | १३ | कुयोनि बीजं | कुयोनिबीजं |
| ,, | १६ | सर्व काल | सर्वकाल |
| ३ | ३ | मपि च | मपि मो |
| ,, | १६ | मत्त्वा | मत्वा |
| ४ | ५ | पूज्य स्त्रिदशो | पूज्यस्त्रिदशो |
| ,, | ६ | भुवन त्रय | भुवनत्रय |
| ,, | १२ | निःसुताः | निस्सुताः |
| ,, | २५ | लोमंगताः | लोमं गताः |
| ५ | २१ | नाथा श्चक्रेश्वरा | नाथा—श्चक्रेश्वरा |
| ,, | २३ | समृद्ध विभवा | समृद्धविभवा |
| ,, | २४ | शालिनोपिकालेन | शालिनोपि कालेन |
| ,, | ,, | हत केन | हतकेन |
| ६ | २ | नेलें; बरें सारांश | नेलें बरें ? सारांश, |
| ,, | ८ | न्विताः | न्विता |
| ,, | ९ | बलं नो | बलं ॥ नो |
| ,, | २५ | नारायणोसौ | नारायणोसौ । |
| ७ | २ | वराकं | वराकं । |
| ,, | १२ | पाण्डवाः | पाण्डवाः । |
| ,, | १५ | साधारणं | साधारणं । |
| ८ | १ | संस्थं | संस्थं । |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध |
|---|---|---|---|
| ,, | ३ | नभ्रासि | नमासि |
| ,, | ,, | वा | वा । |
| ,, | १९ | काहीं | कांहीं |
| ९ | ४ | कोटि विशेषतः | कोटिविशेषतः |
| ,, | ८ | कोट्यवधि | कोट्यावधि |
| ,, | ,, | जिवित | जीवित |
| ,, | ११ | मुचैः गृह | मुचै–गृह |
| ,, | १९ | धर्म वर्णनं | धर्मवर्णनं |
| ,, | २० | पाप वर्णनं | पापवर्णनं |
| ९ | २० | विद्धिश्वभ्र | विद्धि श्वभ्र |
| ,, | २१ | क्लेशादि भाण्डारं | क्लेशादिभाण्डारं |
| ,, | ,, | सत्यंदुःखाकरं | सत्यं दुःखाकरं |
| १० | ३ | हीनाहि | हीना हि |
| ,, | ४ | इहामुत्रच | इहामुत्र च |
| ,, | ९ | धान्य गृहादिकं | धान्यगृहादिकं |
| ,, | १० | लोकी | लोकीं |
| ,, | १४ | शत्रूच | शत्रू च |
| ,, | १८ | पातका पासून | पातकापासून |
| ,, | २१ | सकल भव | सकलभव |
| ,, | ,, | शोकादि बीजं | शोकादिबीजं |
| ,, | २२ | सर्व दारिद्य | सर्वदारिद्य |
| ११ | १० | संशुद्ध सत्य | संशुद्धसत्य |
| ,, | १९ | पावलेल्या | पाळलेल्या |
| १२ | १२ | सकल कुधर्म | सकलकुधर्म |
| ,, | २० | स्विकार | स्वीकार |
| १३ | १० | नीच देव | नीचदेव |
| ,, | १९ | मुढ | मूढ |
| ,, | १६ | वरंच | वरं च |

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ,, | २१ | बहेतर | बेहतर |
| ,, | २५ | मोक्षैक शत्रुं | मोक्षैकशत्रुं |
| १४ | २ | मूळी | मुळी |
| ,, | १० | ज्ञानहांनो | ज्ञानहीनो |
| ,, | ,, | असतों | असतो |
| १५ | १० | विमल गुण | विमलगुण |
| ,, | १४ | समुदायानीं | समुदायांनीं |
| ,, | २० | दिपक | दीपक |
| ,, | २२ | ज्ञान वर्णनं | ज्ञानवर्णनं |
| ,, | २३ | चारित्र वर्णनं | चारित्रवर्णनं |
| ,, | २३ | चैक दिनं | चैकादिनं |
| ,, | २४ | चारित्र हीनं | चारित्रहीनं |
| १६ | ४ | कोट्यवधि | कोट्यावधि |
| ,, | १८ | चर्यायाः | चर्याया |
| ,, | २३ | वीराः | वीरा |
| ,, | २४ | मुनिनिर्मिताः | मुनिमिर्मताः |
| ,, | २७ | गृहण | ग्रहण |

ह्या अशुद्धामुळें त्या छापखान्यांत ह्याचे पुढील भाग न छापवितां बेळगांव येथील " बेळगांवसमाचार " छापखान्यांत छापविला.

१।१०।९७. कृ. ना. जोशी.



चारित्रचलितो जीवो जीवन्नपि मृतोपमः ॥
मृतश्चारित्रसंयुक्त इहामुत्र च जीवति ॥ ४७ ॥

म. अर्थ—चारित्रभ्रष्ट जीव जीवंत असूनही मृत झाल्यासारखा आहे, चारित्रधारी जीव मरण पावला तरी इहलोकीं व परलोकीं तो जीवंत आहे.

त्रिभुवनजनमान्यं तीर्थनाथैर्निषेव्यं ॥
विबुधगणगरिष्टैः सेवितं मुक्तिबीजं ॥
विमलगुणनिधानं सर्वकल्याणमूलं ॥
गतसकलविकारं वृत्तमाराधय त्वं ॥ ४८ ॥

म. अर्थ—चारित्र हें त्रैलोक्यांतील लोकांस मान्य आहे, तीर्थकरांनीं पाळिलें आहे, मोठमोठ्या ज्ञात्यांनीं प्रशंसिलें आहे, मोक्षास कारण आहे, निष्पाप गुणांचा ठेवा आहे, सर्व कल्याणांचें मूळ आहे, ज्यांत कोणताही कमीपणा नाहीं अशा चारित्राचा तूं अंगिकार कर.

## ॥ इंद्रियजयवर्णनम् ॥

इंद्रियैस्तस्करैर्लोको वराको व्याकुलीकृतः
धर्मरत्नं समाहृत्य मनोभूपतिकिंकरैः ॥ ४९ ॥

म. अर्थ— मनोरूप राजाची चाकरी करणाऱ्या ह्या चोरट्या इंद्रियांनीं धर्मरूपरत्न चोरून नेऊन हा क्षुद्र जन अगदीं घाबरा करून टाकिला आहे

येन वैराग्यखड्गेन हताश्चेंद्रियतस्कराः ॥
तस्य मोक्षो भवेत्सद्यः किं वृथा कायदंडनैः ॥ ५० ॥

म. अर्थ ज्यानें वैराग्यरूप शस्त्रानें इंद्रियरूप चोर मारिले त्याला तत्काल मोक्ष प्राप्त होईल, व्यर्थ शरीरास कष्ट कशास पाहिजेत !

**इंद्रियाणि न गुप्तानि जयं कृत्वा हृदि स्तु यैः ॥**
**जिनमुद्रां समादाय तैरात्मा वंचितः शठैः ॥ ५१ ॥**

म. अर्थ—ज्यांनीं जिनदीक्षा घेऊनही इंद्रियें वश करून आत्मस्वरूपाकडे लाविलीं नाहींत, त्या मूर्खांनीं आत्मा फसविला. त्यांचें जीवित्व व्यर्थ आहे.

**इंद्रियाणि न शक्नोति जेतुं यः पुरुषाधमः ॥**
**दीक्षां गृण्हंस्तपः कुर्वन्स किं लोके न लज्जति ? ॥५२॥**

म. अर्थ—जो नीच मनुष्य इंद्रियें स्वाधीन ठेवण्यास असमर्थ आहे, तो नीच दीक्षा घेऊन तपश्चर्या करण्यास जगांत लाजत कसा नाहीं ?

**चौराश्चेंद्रियनामका गतघृणा लुण्ठन्ति लोकस्य त—॥**
**द्वृत्तज्ञानगुणादिरत्ननिचितं भाण्डं जगत्तारकं ॥**
**ये संगृह्य यतीश्वराः शमधनुः शौर्येण मार्गे स्थितान् ॥**
**घ्नंति ध्यानशरेण तत्र सुखतो यान्त्येव मुक्त्यालयं ५३**

म. अर्थ—इंद्रियनांवाचे निर्दय चोर लोकांचें दर्शन, ज्ञान, चारित्र नांवांचीं रत्नें भरलेलें, विश्वास तारणारें, भांडें चोरून नेतात. जे मुनीश्वर मार्गांत बसणाऱ्या त्या चोरांस आपल्या हातांत शांतिरूप धनुष्य घेऊन ध्यानरूप बाणानें पराक्रमानें जिंकितात, ते मुनीश्वर त्याच भवांत सुखानें मोक्षास खचित जातात.

## ॥ नारीसंगत्यजनवर्णनम् ॥

**वरं हुताशने पातो वरं कण्ठे हि सर्पिणी ॥**
**नैव चालिंगिता स्वस्त्री श्वभ्रगेहप्रतोलिका ॥ ५४ ॥**

म. अर्थ—अग्नींत उडी मारणें बरें, गळ्यांत सर्पीण असलेली बरी, परंतु नरकगृहाची मोठी वेस अशी आपली स्त्री भेटलेली नको.

**चित्रादिनिर्मिता नारी मनःक्षोभं करोति वै ॥**
**योषित्संसर्गवार्तादौ कथमेकत्र तिष्ठति ? ॥ ५५ ॥**

म. अर्थ–लांकडाची बाहुली वगैरे असली तरी, ती मनाला चंचल करिते, मग प्रत्यक्ष स्त्री भेटणें, गोष्टी सांगणें इत्यादि क्रियांनीं मन चंचल कां होणार नाहीं ?

**एकत्र वसतिः श्लाघ्या सर्पव्याघ्रारितस्करैः ॥**
**न हि नार्या समं सद्भिः क्षणमेकं प्रशस्यते ॥ ५६ ॥**

म. अर्थ–ज्ञात्यांनीं साप, वाघ, शत्रु, चोर ह्यांच्या बरोबर सहवासास राहणें बरें; परंतु स्त्रीसहवर्तमान एक क्षणभर राहणें योग्य नाहीं.

**सर्पिणी खादति स्पर्शान्नारी खादेच्च दूरतः ॥**
**तस्या दृष्टिविषा नाम श्रुत्वा देशान्तरं व्रज ॥ ५७ ॥**

म. अर्थ–सर्पीण आपण तिला पाय लाविला किंवा लागला तर चावेल; परंतु स्त्री दूर असली तरी चावेल, तिचें नांव दृष्टि-विषा ( सर्पीण ) आहे असें ऐकून दूर देशास जा.

**धर्मरत्नमपहृत्य तस्करी ॥**
**प्राणिनं नयति दुर्गतिं स्वयं ॥**
**ब्रह्मचर्यदृढमुष्टियष्टिभि-॥**
**स्तान्निवारय वधुं स्वमानसात् ॥ ५८ ॥**

म. अर्थ–ही स्त्रीरूप चोर प्राण्याच्या धर्मरूप रत्नास चोरिते, व त्यास स्वतः नरकास नेते. ह्यास्तव त्या स्त्रियेस ब्रह्मचर्यरूप बळकट मूठ असणाऱ्या काठ्यांनीं आपले मनांतून हांकून दे.

## ॥ नारीरूपमध्ये विचारय ॥

**श्वभ्रागारसमाकारे योनिरंध्रे घृणास्पदे ॥**
**स्रवन्मूत्रे हि दुर्गंधे कामी क्रीडति कीटवत् ॥ ५९ ॥**

म. अर्थ–नरकाकृति घाणेरड्या दुर्गंधि मूत्रस्राव होणाऱ्या योनिरंध्रांत विषयातुर मनुष्य किड्यासारखा खेळतो.

**मुखं श्लेष्मादिसंसिक्तं चर्मबद्धास्थिसंचयं ॥**
**दुर्गंधं हि वरस्त्रीणां कामी लिहति चादरात् ॥ ६० ॥**

म. अर्थ–सुंदरस्त्रियेचें मुख झालें तरी तें थुंकी, लाळ ह्यांनीं भरलेलें असून कातड्यांत बांधलेल्या हाडांचा ढीग आहे, व दुर्गंधि आहे, तरी विषयासक्त मनुष्य आवडीनें चुंबन घेतो.

**मांसपिण्डौ स्तनौ स्त्रीणां चोदरं कृमिमंदिरं ॥**
**विष्ठादिनिचितं कामी तत्र क्रीडति काकवत् ॥ ६१ ॥**

म. अर्थ–स्त्रियांचे स्तन मांसाचे गोळे आहेत, पोट किड्यांचें घर आहे, विष्ठा, मूत्र इत्यादिकांनीं भरलें आहे, विषयी पुरुष त्या ठिकाणीं कावळ्यासारखा खेळतो.

**गौरचर्मावृतं धीर वस्त्राभरणभूषितं ॥**
**योषिद्रूपं समालोक्य त्वं तन्मध्ये विचारय ॥ ६२ ॥**

म. अर्थ–हे विचारी मनुष्या, वस्त्र दागिने ह्यामुळें शोभणारें शुभ्र कातड्यानें झांकलें गेलेलें, स्त्रीजनांचें रूप पाहून तूं त्यांत विचार कर.

**कचकुटिलमुखं तच्चर्मबद्धास्थिराशि ॥**
**स्रवति च मलमूत्रं पूतिगन्धं कुशीलं ॥**
**कृमिकुलशतपूर्णं स्त्रीशरीरं हि मत्वा ॥**
**सुखदमनिशमत्र ब्रह्मचर्यं भजस्व ॥ ६३ ॥**

म. अर्थ–मुख कुरळ्या केशांनीं भरलेलें आहे, बाकीचें आंग कातड्यांत गुंडाळलेलीं हाडें आहेत, त्यांतून दुर्गंधी मल-मूत्र सारखें वाहत आहे, शेंकडो लहान लहान किड्यांचें हें मंदिर आहे, अशा ह्या स्त्रियांच्या शरीराविषयीं योग्य विचार करून नेहमीं सुख देणाऱ्या ब्रह्मचर्याचा स्वीकार कर.

## ॥ कामत्यजनवर्णनम् ॥

**नयनाभ्यां न पश्येच्च वरं चांधोऽतरे पुनः ॥**
**द्वाभ्यां किंचिन्न पश्येच्च कामान्धो वस्तुतःसदा ॥६४॥**

म. अर्थ–आंधळा मनुष्य डोळयांनीं कांहीं पहात नाहीं तरी मनांत सारासार विचार पहातो, तो बरा, परंतु कामांध मनुष्यास डोळयांनीं दिसत नाहीं व विचार ही करितां येत नाहीं.

**कामी करोति यत्कर्म जिव्होपस्थादिमोहतः ॥**
**तत्फलं श्वभ्रगत्यादौ भुंक्ते वाचामगोचरं ॥ ६५ ॥**

म. अर्थ–विषयी मनुष्य जिव्हा व शिश्न ह्यांस वश होऊन जीं जीं कामें करितो, त्याचें फळ नरकादिगतींत सांगतां न येणाऱ्या दुःखस्थितींत भोगतो.

**सुखं दुःखं हितं पुण्यं पापं बंधवधादिकं ॥**
**मरणं वा समीपस्थं कामी वेत्ति न दुर्गतिं ॥ ६६ ॥**

म. अर्थ–सुख, दुःख, कल्याण, पुण्य, पाप, बंधन, वध, जवळ आलेलें मरण, नरक इत्यादि कोणत्याही गोष्टींस विषयी मनुष्य मनांत आणीत नाहीं.

**तिलमात्रसुखार्थं हि कामी त्यजति सद्व्रतं ॥**
**येन मेरुसमं दुःखमिहामुत्र लभेत च ॥ ६७ ॥**

म. अर्थ–अल्पसुखासाठीं देखील विषयी पुरुष चांगलें व्रत मोडतो, ह्यामुळें ह्या लोकीं व परलोकीं त्यास पर्वतासारखें दुःख भोगावें लागतें.

**कामबाणविषमाहिताडितः ॥**
**भेषजं त्यजति धर्मनाम यः ॥**
**भूरिजन्मबहुदुःखपीडितः ॥**
**स व्रजेन्निरयमेव दारुणं ॥ ६८ ॥**

म. अर्थ–जो मनुष्य मदनबाणरूप कालसर्पानें दंश केला असतां धर्म नांवाचें उत्तम औषध घेण्याचें सोडितो, तो अनेक जन्मांत अनेक प्रकारचीं दुःखें भोगून दारुण नरकास जाईल.

## ॥ वीतरागसेवनवर्णनम् ॥

**एकचित्तेन यो धीमान् वीतरागं भजेत्सदा ॥**
**स्वर्गराज्यादिकं सर्वं स भुंक्त्वा तादृशो भवेत् ॥६९॥**

म.अर्थ–जो बुद्धिवान् नेहमीं एकनिष्ठपणानें सर्वज्ञदेवास भजेल तो सर्वप्रकारचें राज्यसुख व स्वर्गसौख्य भोगून त्या सर्वज्ञा सारखा होईल.

**वीतरागं परित्यज्य रागद्वेषान्वितं भजेत् ॥**
**देवं चिंतामणिं त्यक्त्वा लोष्टं गृण्हाति सोऽधमः ॥७०॥**

म. अर्थ–जो कोणी मनुष्य सर्वज्ञ वीतराग देवास सोडून राग व द्वेषानें युक्त असणाऱ्या देवास भजतो, तो मूर्ख चिंतामणि रत्न टाकून मातीचें ढेकुळ घेतो.

**द्वौ देवौ सेवते मूढो द्वौ धर्मौ द्वौ गुरू च सः ॥**
**उन्मत्तवत्स विज्ञेयः कार्याकार्याविचारकः ॥ ७१ ॥**

म. अर्थ–जो मूर्ख दोन देव, दोन धर्म, दोन गुरु ह्यांस भजतो, तो उन्मत्ताप्रमाणें कोणतें करावें कोणतें करूं नये ह्या विषयीं मूढ असल्यासारखा जाणावा.

**विबुधकुमुदचंद्रं सर्वदुःखापहारं ॥**
**त्रिभुवनपतिसेव्यं सर्वरत्नाकरं वै ॥**
**स्वपरहितमपारं स्वर्गमोक्षैकहेतुं ॥**
**सकलगुणनिधानं तीर्थनाथं भज त्वं ॥ ७२ ॥**

म. अर्थ–विद्वज्जनरूपचंद्रविकासिनी कमळांचा चंद्र, सर्व दुःखें दूर करणारा, त्रैलोक्यांतील राजांनीं वंदिलेला, सर्व वस्तूंचा समुद्र अशा सर्वज्ञ वीतरागास त्वां भजावें.

## ॥ निर्ग्रंथगुरुसेवावर्णनम् ॥

**ज्ञानचारित्रयुक्तो यः गुरुर्धर्मोपदेशकः ॥**
**निर्लोभस्तारको भव्याः स सेव्यः स्वहितैषिणा ॥७३॥**

म. अर्थ-जो ज्ञानी व सदाचारी असून धर्माचा उपदेश करणारा गुरु आहे, ज्याला लोभ नाहीं, जो आपण तरून दुसऱ्यांस तारितो. हे भव्य जीवहो, आपलें हित इच्छिणाऱ्यानें त्यास भजावें.

**मुनिस्तीर्त्वा स्वयं सोन्यांस्तारयेत्स महागुरुः ॥**
**स्वयं मज्जति यः सोन्यान् कथं तारयितुं क्षमः ॥ ७४ ॥**

म. अर्थ-जो मुनीश्वर आपण स्वतः तरून दुसऱ्यांस तारितो, तो महागुरु होय. जो मुनि स्वतः बुडतो तो दुसऱ्यांस कसा तारील?

**निर्ग्रंथसेवको धीमान् स्वर्गमोक्षादिकं व्रजेत् ॥**
**सग्रंथाराधको मूढः श्वभ्रतिर्यग्गतिं व्रजेत् ॥ ७५ ॥**

म. अर्थ-निर्ग्रंथ मुनीची सेवा करणारा बुद्धिमान् स्वर्गास व मोक्षास जातो, परिग्रह असणाऱ्याची सेवा करणारा मूर्ख नरकगतीस किंवा पशुगतीस जातो.

**मातृपितृकुटुंबादि सर्वमुध्दर्त्तुमक्षमं ॥**
**गुरुस्तारयते जीवान् धर्महस्तैर्भवार्णवात् ॥ ७६ ॥**

म. अर्थ-प्राणीमात्रांस आईबाप कुटुंब वगैरे कोणी तारण्यास समर्थ नाहीं, परंतु गुरु धर्मरूप हातांच्या सहायांनीं संसार समुद्रांतून जीवांस तारितो.

**यो निर्ग्रंथं गुरुं त्यक्त्वा कुगुरुं सेव्यते स वै ॥**
**कल्पवृक्षं गृहद्वारे छित्वा धत्तूरकं वपेत् ॥ ७७ ॥**

म. अर्थ-जो निर्ग्रंथ गुरुस सोडून कुगुरूस भजतो, तो तर

आपल्या घराच्या दारापुढलि कल्पवृक्षास तोडून धोत्र्याचें झाडास लावितो.

स्वपरगतविचारं प्राप्तसंसारपारं ॥
निरुपमगुणयुक्तं ज्ञानविज्ञानदक्षं ॥
विजितकरणजालं भव्यलोकैकपोतं ॥
विगतसकलदोषं श्रीगुरुं त्वं भजस्व ॥७८॥

म. अर्थ-ज्याला आपला व परका असा भेद नाहीं. संसारसमुद्रांतून मुक्त झालेला, अगणितगुणांनीं युक्त असणारा, ज्ञान व ज्ञानाची आंगें जाणणारा, इंद्रियांचा समुदाय जिंकिणारा, भव्यजीवांची एक नौकाच असा, ज्याला दोष देण्यास जागाच नाहीं अशा श्रीगुरुस तूं भजावेंस.

## ॥ तपोवर्णनं ॥

तपःकरोति यो धीमान् मुक्तिश्रीरंजिताशयः ॥
स्वर्गो गृहांगणे तस्य राज्यसौख्यस्य का कथा ? ॥ ७९ ॥

म. अर्थ-जो बुद्धिमान् मुक्तीकडे लक्ष्य देऊन तपश्चर्या करितो, त्याला स्वर्गलोक घराचे आंगणांत असल्यासारख्या आहे, मग राज्यसुखाची काय विशाद आहे ?

तपसालंकृतो जीवो यद्यद्वस्तु समीहते ॥
तत्तदेव समायाति भुवनत्रितये ध्रुवं ॥ ८० ॥

म. अर्थ-तपश्चर्येमुळें शोभणारा जीव, ज्या ज्या वस्तु इच्छितो त्या त्या त्याला त्रैलोक्यांत कोठेंही असल्या तरी मिळतात.

तपोहीनो नरो ज्ञेयः पशुरेव स मूर्तिमान् ॥
इहलोके च रोगी स्यादमुत्र दुर्गतिं व्रजेत् ॥ ८१ ॥

म. अर्थ-तपश्चर्या न करणारा मनुष्य प्रत्यक्ष पशु समजावा, या लोकीं तो रोगी होतो व मरणानंतर नरकास जातो.

**तीर्थनाथश्चतुर्ज्ञानयुक्तो देवार्चितो ध्रुवं ॥**
**विमुक्त्यर्थं तपः कुर्यादन्यैः किं क्रियते न तत् ॥ ८२ ॥**

म. अर्थ–चार ज्ञानें असणारा, देवादिकांनीं पुजिलेला तीर्थंकर देखील खरोखर मोक्षासाठीं तप करितो, मग तें दुसऱ्यांनीं कां करूं नये ?

**कर्मपर्वतनिपातनवज्रं ॥**
**स्वर्गमुक्तिसुखसाधनमंत्रं ॥**
**मन्मथेंद्रियदमं शमबीजं ॥**
**त्वं तपः कुरु समीहितदातृं ॥ ८३ ॥**

म. अर्थ–तपश्चर्या, कर्मरूप पर्वतावर पडणारें वज्र आहे, स्वर्गसुख व मोक्षसुख मिळण्याचा मंत्र आहे, मदनेंद्रियास शमविणारें आहे, व शांतीचें मूळ आहे, त्या इच्छा पुरविणाऱ्या तपश्चर्येस तूं कर.

**करोति स्म तपो यस्तु स्वर्गं राज्यं समाप्य सः ॥**
**मुक्तिं च लभते श्रेष्ठीनंदनो नागदत्तवत् ॥ ८४ ॥**

म. अर्थ–जो तपश्चर्या करितो तो स्वर्गसुख व राज्यसुख पाऊन शेटीचा मुलगा नागदत्ताप्रमाणें मोक्षास जातो.

## ॥ अथ जिव्हावशीकरणवर्णनं ॥

**यो जिव्हालंपटो मूढः खाद्याखाद्यं न मन्यते ॥**
**अखाद्यं भक्षयित्वा स दुर्गतिं याति पापधीः ॥ ८५ ॥**

म. अर्थ–जो मूर्ख जीभ स्वाधीन नसल्यामुळें खावें काय न खावें काय ह्याचा विचार करीत नाहीं, तो पापी खाऊं नये तेंच खाऊन नरकास जातो.

**तिलमात्रसमे कंदेप्यनंता जीवराशयः ॥**
**तस्य भक्षणतो मुक्ताः सर्वे जीवाः कुदृष्टिभिः ॥ ८६ ॥**

म. अर्थ—अगदीं कहानशा देखील कंदांत कोट्यावधि जीव राहतात, तें खाल्ल्यास मिथ्यादृष्टींनीं सर्व जीव खाल्ल्यासारखे झाले.

सर्षपेण समं स्वादौ जिव्हालंपट आचरेत् ॥
पापं भूरिभवैर्दुःखं येन मेरुसमं भजेत् ॥ ८७ ॥

म. अर्थ—जिव्हा स्वाधीन नसणारा मनुष्य आवडत्या वस्तू साठीं मोहरी इतकें पाप करील तरी त्याचें त्याला अनेक जन्मांत मेरुपर्वता एवढें दुःख भोगावें लागेल.

मधु भोक्ष्यति यो रागी बिंदुमात्रं कुधीः स वै ॥
रोगस्य भाजनं भूत्वा श्वभ्रादिकुगतिं व्रजेत् ॥ ८८ ॥

म. अर्थ—जो वाईट बुद्धीचा मनुष्य थेंबभर मद्य पिईल, तो रोगाचें माहेर घर होऊन नरकादिक वाईट गतीस जाईल.

जिव्हां वशे न यः कुर्यात्सर्वभक्षणशाकिनीं ॥
दीक्षामादाय कुर्वन्स तपः किं न हि लज्जति ? ॥८९॥

म. अर्थ—नानाप्रकारचे पदार्थ खाण्याविषयीं जी प्रत्यक्ष राक्षसीच अशा जिभेस जो मनुष्य स्वाधीन ठेवीत नाहीं तो दीक्षा घेऊन तपश्चर्या करितांना लाजत कां नाहीं ?

जिव्हां भो बुध सर्वभक्षणपरां पापस्य दुःखस्य वा ॥
खानिं स्वर्गगृहार्गलां दृढतरां श्वभ्रालये दीपिका ॥
सद्धर्मालयतस्करीं दृढतरैः सारव्रतैः पाशकैः ॥
त्वं बध्वा भज मुक्तिसंगसुखदं वैराग्यरत्नं दृढं॥९०॥

म. अर्थ—अरे ज्ञानी मनुष्या, सर्व प्रकारचे पदार्थ खाण्याचे कामांत दक्ष, पातकाची किंवा दुःखाची खाण, स्वर्गरूप गृहाची बळकट आगळ, नरक गृहांतील दिवटी, सद्धर्मरूप गृहांतील चोरी करणारी अशा ह्या जिभेस चांगलीं व्रतें ह्याच बळकट

पाशांनीं बांधून मोक्षप्राप्तीचें मुख देणाऱ्या वैराग्यरूप रत्नास बळकट धर.

॥ द्वेषवर्णनं ॥

वीतरागे मुनौ शास्त्रे यो द्वेषं कुरुतेऽधमः ॥
धर्मविद्भिर्जनैः सोपि निंद्यो निंद्यां गतिं व्रजेत् ॥९१॥

म. अर्थ–जो नीच मनुष्य सर्वज्ञ देवाविषयीं, मुनीविषयीं, शास्त्राविषयीं द्वेष करितो, तो धार्मिक मनुष्यांचे देखील निंदेस पात्र होऊन निंद्यगतीस जातो.

यदि कश्चित्कुधीः कुर्याद्वधबंधादि ताडनं ॥
मारणं वा तथाप्यस्य द्वेषस्त्याज्यो विवेकिभिः॥९२॥

म. अर्थ–जर कोणी वाईट बुद्धीचा मनुष्य आपला खून करील, आपणास बंदींत ठेवील, मारील किंवा मारवील तरी पण विद्वानांनीं त्याचा द्वेष करूं नये.

द्वेषं त्यक्तुमशक्तो यः कष्टदायि चरेत्तपः ॥
कायक्लेशस्तपस्तस्य ज्ञेयमत्र विवेकिभिः ॥ ९३ ॥

म. अर्थ–द्वेष सोडण्यास जो असमर्थ असून शरिरास कष्ट-देणारी तपश्चर्या करितो, त्याचें तप शरिरास कष्टच होत. दुसरा त्याचा उपयोग नाहीं, असें विचारी मनुष्यांनीं समजावें.

कामलोभादिशत्रूणां पापमोहादिविद्विषां ॥
द्वेषो मूलं विदित्वैनं दूरी कार्यो महर्षिभिः ॥ ९४ ॥

म. अर्थ–काम क्रोध मद मत्सर पातक मोह वगैरे शत्रूंचा द्वेष हा मुख्य कारण आहे, असें जाणून मुनीश्वरांनीं त्यास सोडून द्यावें.

नरकगृहकपाटोद्घाटनं पापबीजं
सकलकुगतिहेतुं मुक्तिनिर्नाशकं वै ॥
मुनिवरगणनिंद्यं द्वेषशत्रुं हन त्वं ॥
दृढतरशमशस्त्रं चित्तहस्ते गृहीत्वा ॥ ९५ ॥

द्वेष हा नरकगृहाचें कवाड उघडतो. तो पातकाचें मूळ आहे, सर्व प्रकारच्या दुःखांचें मूळ आहे. मुक्तीचा नाश करणारा आहे, मुनीश्वरांनीं तिरस्कृत केलेला आहे, अशा ह्या द्वेषरूप शत्रूला चित्तरूप हातांत शांतिरूप बळकट शस्त्र घेऊन मार.

## ॥ रागत्यजनवर्णनं ॥

पुत्रमित्रकलत्रादि सर्वं गृहकुटुंबकं ॥
धनधान्यादिसद्वस्तु दृष्ट्वा रागं त्यजेद्बुधः ॥ ९६ ॥

म. अर्थ–पुत्र, मित्र, स्त्री, गृह, नातलग, धन, धान्य इत्यादि चांगल्या वस्तु पाहिल्या तरी त्यावर विद्वान् मनुष्य आवड धरीत नाहीं.

इंद्रियाहारकायादि गजवाजिरथादिकं ॥
लब्ध्वोपकरणं सारं छत्रं रागं त्यजेन्मुनिः ॥ ९७ ॥

म. अर्थ–सर्व इंद्रियें, खाण्यापिण्याचें सुख, शरीर, हत्ती, घोडे, रथ, चांगलें छत्र वगैरे जिन्नस मिळाले तरी त्यांवर मुनीश्वर ममता करीत नाहीं.

रागी बध्नाति कर्माणि निंद्यं कर्म करोति च ॥
भोगस्याकांक्षया तस्मादिहामुत्र च दुःखभाक् ॥ ९८ ॥

म. अर्थ–विषयी मनुष्य कर्म सांचवितो, व विषयोपभोगाच्या आशेनें कुत्सित काम करितो त्यामुळें ह्यालोकीं व परलोकीं त्यास दुःख भोगावें लागतें.

रागं हन्तुमशक्तो यः शरीरादिसमुद्भवं ॥
कायक्लेशादिकं कुर्वन्निर्लज्यः किं भवेन्नसः ॥ ९९ ॥

म. अर्थ–शरीरादिकांवरील ममत्व सोडण्यास जो असमर्थ आहे, तो शरीरास कष्ट देणारें तप करीत असला तरी निर्लज्य कां नव्हे ?

रागशत्रुरशुभोहि रागिणां ॥
दुर्गतिं नयति धर्मतस्करः ॥
येन सोपि निहतः क्षमासिना ॥
तस्य मुक्तिरुपयाति च स्वयं ॥ १०० ॥

म. अर्थ–विषयी मनुष्यांचा ममतारूप शत्रु अतिशय नाश करितो, धर्माची चोरी करून तो नरकास नेतो. तो देखील ज्यानें क्षमारूप खड्गानें मारिला, त्याला मुक्ति आपाप मिळते.

## ॥ क्रोधत्यजनवर्णनं ॥

धनधान्यादिवस्त्वर्थे कुटुम्बादिकृतेथवा ॥
वधबंधादिके प्राप्ते क्रोधस्त्याज्यो विवेकिभिः ॥ १ ॥

म. अर्थ–द्रव्य, धान्य वगैरे वस्तु मिळण्यासाठीं, कुटुंबाचे पोषणासाठीं, बंधनाचा किंवा मरण्याचा प्रसंग आला तरी विचारी मनुष्यांनीं राग सोडावा.

क्रोधानलमहादाहः समुत्पन्नः शरीरिणां ॥
निर्दहाति तपोवृत्तं धर्मं द्वीपायनादिवत् ॥ २ ॥

म. अर्थ–क्रोधाग्नीपासून उत्पन्न झालेली मोठी ज्वाला मनुष्यांचे तपोवृत्त वगैरे धर्मास द्वीपायन मुनीनें द्वारका जाळिली त्याप्रमाणें जाळिते.

पूर्वं शोषयते गात्रं क्रोधाग्निः प्रकटीस्थितः ॥
पश्चादन्यान् जनान् दद्याद्दुःखशोकादिदुर्गतिं ॥ ३ ॥

म. अर्थ–स्पष्ट झालेला कोपाग्नि अगोदर स्वतःचे शरीरास जाळतो, मागाहून इतर जनांस त्रासदायक होतो, व दुःखशोक देऊन नरकास नेतो.

तावत्तपो व्रतं ध्यानं स्वस्थं चित्तं दयादिकं ॥
यावत्क्रोधो न जायेत तस्मात्कोपं त्यजेन्मुनिः ॥ ४ ॥

म. अर्थ—जोंपर्यंत राग आला नाहीं तोंपर्यंत तप, व्रत, ध्यान, शांतमन, दया वगैरे सर्व कांहीं आहे, व्हास्तव मुनीश्वर राग सोडितो.

क्रोधशत्रुरतिदुःखदो नृणां ॥
धर्मरत्नहरणे च तस्करः ॥
श्वभ्रमूलगृहमार्गदर्शक-॥
स्तं मुनिर्हनति सत्क्षमासिना ॥ ५ ॥

म. अर्थ—क्रोधरूप शत्रु मनुष्यांस अतिशय दुःख देणारा आहे, धर्मरत्न हरण करण्याविषयीं चोर आहे, नरकरूप गृहाचा मार्गदर्शक आहे, त्याला मुनीश्वर क्षमारूप खड्गानें तोडितो.

## ॥ मानत्यजनवर्णनं ॥

तपोज्ञानादिसंभूतो मदो न क्रियते बुधैः ॥
मदे कृते मनुष्याणां तपो ज्ञानं हि नश्यति ॥ ६ ॥

म. अर्थ—तपश्चर्या व शहाणपणा ह्यांपासून उत्पन्न होणारा गर्व शहाण्यांनीं करूं नये, कांतर गर्व केल्यानें मनुष्यांचें तप व ज्ञान नाश पावतें.

अहंकारं त्यजेद्धीमान्धनधान्यादिवस्तुषु ॥
यतो न निष्ठुराः केपि दुष्टराजाग्नितस्कराः ॥ ७ ॥

म. अर्थ—बुद्धिमान् मनुष्य धन धान्य वगैरे वस्तूंवरील अभिमान सोडितो. कांतर ज्यापेक्षां वाईट चालीचा राजा, अग्नि, चोर कोणीही जास्त निर्दय नाहींत.

यो मदान्धो न जानाति हिताहितविवेचनं ॥
स पूज्येषु मदं कृत्वा श्वानगर्दभवद्भवेत् ॥ ८ ॥

म. अर्थ—जो मदोन्मत्त मनुष्य हिताहिताचा विचार करीत नाहीं, तो मोठ्या मनुष्यांशीं गर्व करून कुत्र्यासारखा व गर्दभासारखा होईल.

अहंकारोपि कर्त्तव्यः कामक्रोधमदादिषु ॥
कर्मेंद्रियचरित्रेषु सर्वेषु गुणशालिभिः ॥ ९ ॥

म. अर्थ–विद्वानांनीं अभिमान देखील करावा, परंतु तो कोणावर? तर, काम, क्रोध, मद, मत्सर व सर्व प्रकारचीं कर्मेंद्रियें ह्यांवर. ( कामक्रोध वगैरे उपयोगीं नव्हत. )

निरयतरुसुनीरं कर्मवृक्षस्य बीजं ॥
दुरितविपिनमेघं धर्मवल्लीकुठारं ॥
कुगतिगमनहेतुं मानशत्रुं हन त्वं ॥
सकलमपि सुसारं मार्दवं भो भजस्व ॥ १० ॥

म. अर्थ–अभिमानरूप शत्रु नरकरूप वृक्षास पाणी होय. कर्मरूप वृक्षाचें बीज होय. पातकरूप अरण्यास मेघ आहे, धर्मरूप वेलीवर कुऱ्हाड आहे, वाईट स्थितीस जाण्यास कारण आहे, ह्यास्तव त्यास सोडून देऊन जगांतील सारवस्तु जें मार्दव त्याचा आश्रय कर.

## ॥ मायात्यजनवर्णनं ॥

कूटद्रव्यमिवासारं तपोधर्मव्रतादिकं ॥
मायाविनामनुष्ठानं सर्वं भवति निष्फलं ॥११॥

म. अर्थ–खोटेपणानें मिळविलेल्या द्रव्याप्रमाणें कपटी मनुष्यांचें अनुष्टान, तप, धर्म, व्रत वगैरे सर्व निष्फळ होतें.

मायां करोति यो मूढ इंद्रियादिकसेवनं ॥
गुप्तं पापं स्वयं तस्य व्यक्तं भवति कुष्ठवत् ॥ १२ ॥

म. अर्थ--जो मूर्ख माया व इंद्रियांचें सुख सेवन करितो त्याचें झांकलेलें पाप आपाप कोडाप्रमाणें बाहेर पडतें.

कुटुंबपरिवारादिकायभोगधनादिषु ॥
विनश्वरेषु भोगेषु मायां कः कुरुते ? सुधीः ॥१३॥

म. अर्थ–कुटुंब, परिवार, शरीर, विषयसुख द्रव्य वगैरे नाशवंत वस्तूंवर कोणता शहाणा ममत्व करील?

**मायायुक्तं वचस्त्याज्यं माया संसारवर्धिनी ॥**
**यदि संगपरित्यागः कृतः किं मायया तव ॥ १४ ॥**

म. अर्थ–खोटेंपणाचें बोलणें सोडावें, माया संसार वाढविणारी आहे, जर सर्व संगपरित्याग केला तर तुला मायेचें काय कारण आहे?

**आर्जवं सकलधर्मकारणं ॥**
**स्वर्गमुक्तिधनसौख्यदायकं ॥**
**पातकारिनिवहस्य भीतिदं ॥**
**वीतरागमुनिभिश्च सेवितं ॥ १५ ॥**

म. अर्थ–आर्जव सर्वप्रकारच्या धर्मास कारण आहे, स्वर्ग, मुक्ति, द्रव्य, सुख मिळवून देणारें आहे, पातकरूप शत्रूच्या समुदायास भीति देणारें आहे, सर्वज्ञदेवांनीं व मुनींनीं आदरलेलें आहे.

## ॥ लोभत्यजनवर्णनं ॥

**दीक्षामादाय यो नित्यं द्रव्यं गृण्हाति दुष्टधीः ॥**
**अम्बां विक्रीय दासीं स गृण्हन्निंद्यो बुधैः स्मृतः ॥ १६ ॥**

म. अर्थ–जो दुष्टबुद्धीचा मनुष्य दीक्षा घेऊन नित्य पैशे मिळवितो, तो आईस विकून दासी विकत घेणारा प्रमाणें निंद्य होय असे ज्ञाते मानितात.

**कटिसूत्रं परित्यज्य गृण्हन् द्रव्यादिकं मुनिः ॥**
**यः स किं नहि लज्येत लोकमध्येहि रंकवत् ॥ १७ ॥**

म. अर्थ–कडदोरा सोडून टाकिला तरी जो मुनि पैसा वगैरे घेतो, तो जगांत भिकाऱ्याप्रमाणें निलज्ज कां नव्हे?

धनधान्यादिकं सर्वं त्यक्त्वा गृण्हन् पुनः स्वयं ॥
यो निर्लज्यः स किं न स्यात् स्ववान्तस्वादतत्परः॥१८॥

म. अर्थ-द्रव्य धान्य वगैरे सर्व टाकून जो निर्लज्य पुन्हां घेतो तो आपला ओक पुन्हां खाणाऱ्याप्रमाणें कां नव्हे ?

लोभशत्रुरतिदुःसहोऽगिनां ॥
सर्ववस्तुपरिभक्षणक्षमः ॥
हंति लोकमुभयं च निर्घृणः ॥
मानवं नयति घोररौरवं ॥ १९ ॥

म. अर्थ-प्राण्यांस लोभरूप शत्रु अतिशय दुर्निवार आहे, तो सर्व प्रकारचे जिन्नस खाण्याविषयीं समर्थ आहे. इहलोकीं व परलोकीं तो दुष्ट दुःख देऊन मनुष्यास भयंकर नरकास नेतो.

संतोषं कुरु सर्वसौख्यजनकं दुःखार्णवोत्तारकं ॥
सद्धर्मामलरत्नसागरममुं पापांतकं मुक्तिदं ॥
स्वर्मोक्षैकवशीकरं गुणनिधिं तीर्थेश्वरैः सेवितं ॥
लोभं दुःखभयादितापसदनं बंधो त्यज त्वं सदा ॥२०॥

म. अर्थ-सर्वप्रकारचीं सुखें उत्पन्न करणारा, दुःख समुद्रांतून काढणारा, सद्धर्मरूप निर्मलरत्नांचा समुद्र, पातकें नाश करणारा, मोक्ष देणारा, स्वर्गसुख व मोक्षसुख देणारा, गुणांचा समुद्र, तीर्थंकरांनीं आदरिलेला असा संतोष तूं धर, आणि दुःख, भीति वगैरे तापांचें घरच अशा लोभास तूं सोडून दे.

## ॥ अथ दयावर्णनं ॥

जीवहिंसादिकं कर्म्यं यः करोति नरोऽधमः ॥
स पापसंग्रहं कृत्वा दुर्गतिं याति मत्स्यवत् ॥ २१ ॥

म. अर्थ-जो नीच मनुष्य जीवांचा वध करून पाप करितो तो पापसंग्रह करून मत्स्याप्रमाणें नरकास जातो.

**जीवहिंसासमं पापं न भूतं न भविष्यति ॥**
**न स्यादत्र सदा लोके तस्मात् त्वं त्यज सर्वथा॥२२॥**

म. अर्थ–जीववधासारखें पाप झालें नाहीं, होणार नाहीं, व हल्लीं ही नाहीं ह्यास्तव तूं तें सर्वतोपरी सोडून दे.

**दानं पूजा तपश्चैव ध्यानध्येयादिकं वृथा ॥**
**अहिंसाव्रतवैकल्यात्सुव्रतिप्राणिनां ध्रुवं ॥ २३ ॥**

म. अर्थ–चांगलीं व्रतें पाळणारीं मनुष्यें जर अहिंसाव्रत न पाळतील तर त्यांचें दान, पूजा, तप, ध्यान, ध्येय वगैरे सर्व व्यर्थ आहे.

**हिंसा श्वभ्रनिकेतनं भयकरा स्वर्गार्गला दुःखदा ॥**
**रोगक्लेशकुजन्मबंधजननी पापास्पदं प्राणिनां ॥**
**सर्वानर्थपरंपरार्पणपरा मुक्त्यंगनाभीतिदा ॥**
**भ्रातस्तां त्यज सर्वजन्तुषु दयां मोक्षाप्तये त्वं कुरु२४**

म. अर्थ–हिंसा ही नरकगृह आहे, भय उत्पन्न करणारी आहे, स्वर्गास आडकाठी आहे, दुःख देणारी आहे. रोग, दुःख, नीच कुळांत जन्म, व बंधन ह्यांस मूळ आहे, प्राण्यांस पातक उत्पन्न करणारी आहे, सर्व प्रकारचीं संकटें ओढविणारी आहे, मुक्तिरूप स्त्रीस भय दाखविणारी आहे, ह्यास्तव बंधो, त्या हिंसेस सोडून देऊन मोक्षप्राप्तीसाठीं तूं दया पाळीत जा.

**सर्वप्राणिदयां जिनेन्द्रगदितां स्वर्गार्गलोद्धाटिकां ॥**
**सद्विद्याधनमुक्तिसौख्यजननीं सौख्याकरां धर्मदां ॥**
**संसाराम्बुधितारकां गुणकरां पापांतकां प्राणिनां ॥**
**सद्रत्नत्रयभूमिकां कुरु सदा सर्वेषु जीवेषु तां ॥२५॥**

म. अर्थ–सर्व जीवांविषयीं दया असावी असें जिनेंद्रांनीं ह्मटलें आहे, दया ही स्वर्गाचे द्वाराची आगळ काढणारी आहे, चांगली विद्या, धन व मोक्षसुख देणारी आहे, सुखाची खाण

आहे, धर्मवृद्धि करणारी आहे. संसारसमुद्रांतून तारणारी आहे. सद्गुण उत्पन्न करणारी आहे, जीवांचें पाप नाश करणारी आहे, सम्यग्दर्शनज्ञानचरित्र ह्यांची मूलभूमि आहे. ह्यास्तव सर्व जीवांवर दया करावी.

अहिंसाव्रतसारेण पूज्यो मातंगवद्भवेत् ॥
जीवघाताद्भवेन्निंद्यो धनश्रीरिव मानवः ॥ २६ ॥

म. अर्थ–अहिंसाव्रतानें मनुष्य मातंगाप्रमाणें पूज्य होईल, व जीवहिंसेमुळें धनश्रीप्रमाणें निंदनीय होईल.

## ॥ अथ सत्यवर्णनं ॥

सत्यं हितं मितं ब्रूयान्मर्महिंसादिवर्जितं ॥
धर्मोपदेशकं सारं मुनीशः कर्णसौख्यदं ॥ २७ ॥

म. अर्थ–मुनीश्वर, खरें, हितकारक, थोडेंसें, मर्म व हिंसा न होण्यासारखें, धर्माचा बोध होईल असें व कानांस गोड लागेलसें भाषण बोलो. ( मुनीनें असें बोलावें. )

कर्कशं निष्ठुरं निंद्यं पापाढ्यं दुःखकारणं ॥
हिंसाकारणमन्यच्च न वक्तव्यं विवेकिभिः ॥ २८ ॥

म. अर्थ–क्रूर, कठोर, निंद्य, खोटें, दुःखमूल, जीवघातास मूळ अशारीतीचें भाषण विचाऱ्यांनीं कधीं करूं नये.

जिव्हाख्या सर्पिणी नित्यं स्थित्वा सद्वदने बिले ॥
लोकं जिघत्सति त्वं तां सत्यमंत्रेण कीलय ॥ २९ ॥

म. अर्थ–ही जिव्हा नांवाची सर्पीण नेहमीं मुखरूपी बिळांत राहून लोकांस चावते, तिला खरेपणारूप मंत्रानें हतवीर्य कर.

प्राणान्तेपि न वक्तव्यमसत्यं निंदितं बुधैः ॥
असत्यवचनाज्जीवो निंद्यः श्वभ्रं हि गच्छति ॥३०॥

म. अर्थ– प्राण गेला तरी खोटें भाषण कधीं ही करूं नये,

तें विद्वानांस आवडत नाहीं, कांतर खोटे भाषणानें जीव भयं-
कर नरकास जातो.

बुधजनपरिसेव्यं स्वर्गमोक्षैकमार्गं ॥
सकलसुखनिधानं धर्मबीजं गुणाढ्यं ॥
जिनवचनविविक्तं सर्वपापापहारं ॥
शिवकरमपि सारं त्वं वचो ब्रूहि सत्यं ॥ ३१ ॥

म. अर्थ– खरें बोलणें विद्वानांस आवडतें, सत्यभाषण स्व-
र्गाचा व मोक्षाचा मार्ग आहे, सर्वसुखांचा समुद्र आहे, धर्माचें
मूळ असून गुणांनीं भरलेलें आहे, जिनेंद्र देखील सत्यभाषणा-
ची प्रशंसा करितात, सत्यभाषणानें सर्वपातकांचा नाश होऊन
मोक्ष मिळतो, तें खरें भाषण तूं करीत जा.

सत्यवाक्यामृतादंगी पूज्यः स्याद्धनदेववत् ॥
लोके चासत्यदोषेण निंद्यः सत्यादिघोषवत् ॥ ३२ ॥

म. अर्थ–खरें बोलण्यानें प्राणी धनदेवाप्रमाणें पूज्य होतो,
व खोटें बोलण्यानें सत्यघोषाप्रमाणें निंद्य होतो.

## ॥ अथ अदत्तत्यजनवर्णनं ॥

विस्मृतं पतितं नष्टमदत्तं बुधनिंदितं ॥
धनधान्यादि सर्वं च परस्वं त्यज सर्वथा ॥ ३३ ॥

म. अर्थ–विसरलेलें, पडलेलें, हरवलेलें, न दिलेलें धन धा-
न्य वगैरे कोणत्याही प्रकारचें परक्याचें द्रव्य टाकून दे, घेऊं
नकोस, घेतल्यास विद्वान् निंदा करितात.

परद्रव्यं समादत्ते यो मूढो वंचनादिभिः ॥
स्थितं तस्य गृहाद्याति दारिद्र्यं सन्मुखायते ॥ ३४ ॥

म. अर्थ–जो मूर्ख कपट करून दुसऱ्यांचा पैसा मिळवूं पाहतो
त्याच्या घरांत असलेला पैसा नाश होऊन त्यास दारिद्र्य येतें.

परद्रव्यमपि स्तोकं यो गृण्हाति स तस्करः ॥
वधबंधादिकं प्राप्य श्वभ्रं गच्छति दुर्मतिः ॥ ३५ ॥

म. अर्थ—थोडकेंसें देखील दुसऱ्याचें द्रव्य जो चोर घेतो, त्यास खुन, कैद वगैरे दुःख भोगावें लागून मरणानंतर तो दुर्बुद्धि नरकास जातो.

सत्याचरणाल्लक्ष्मीःस्वयमप्यायाति पुण्ययुक्तस्य ॥
असदाचरतोस्य पुनः हस्तगताप्याशु नष्टतां याति३६

म. अर्थ—खरेपणानें वागणाऱ्या पुण्यवान् पुरुषास संपत्ति आपाप मिळते, खोटेपणानें वागणाऱ्याच्या हातांत असलेली देखील जाते.

सकलविबुधनिंद्यं दुःखसंतापबीजं ॥
विषमनरकमार्गं बंधविच्छेदहेतुं ॥
कुगतिकरमसारं पापवृक्षस्य कंदं ॥
त्यज सकलमदत्तं त्वं सदा मुक्तिहेतोः ॥ ३७॥

म. अर्थ—दुसऱ्याची वस्तु त्यास न कळत घेणें हें कृत्य सर्व विद्वानांनीं निंद्य मानिलेलें आहे, दुःखाला व संतापाला कारण आहे. भयंकर नरकाचा मार्ग आहे, बंधनाचें व नाशाचें कारण आहे, दुर्गतीस नेणारें असून तुच्छ आहे, पातक वृक्षाचा कंद आहे, ह्यास्तव मोक्ष मिळण्यासाठीं तूं त्याचा त्याग कर.

अदत्तपरिहारेण पूज्यः स्याद्वारिषेणवत् ॥
अदत्तादानतः प्राणी निंद्यः स्यात्तापसादिवत् ॥३८॥

म. अर्थ—दुसऱ्याची वस्तु त्यास न कळतां घ्यावयाची नाहीं ह्या दृढनिश्चयानें मनुष्य वारिषेणाप्रमाणें मान्यता पावेल, व घेण्याचे दुर्गुणानें तापसाप्रमाणें लोकांचे उपहासास पात्र होईल.

## ॥ अथ शीलवर्णनं ॥

ब्रह्मचर्यं भवेत्सारं सर्वेषां गुणशालिनां ॥
ब्रह्मचर्यस्य भंगेन गुणाः सर्वे पलायिताः ॥ ३९ ॥

म. अर्थ—सर्व गुणवान् मनुष्यांना ब्रह्मचर्य श्रेष्ठ आहे. ब्रह्मचर्य मोडल्यानें सर्व गुण नाहींतसे होतात.

कामानलमहादाहो वर्त्तते यस्य चेतसि ॥
ब्रह्मचारित्रसद्वृक्षाः भस्मीभावं भजंति वै ॥ ४० ॥

म. अर्थ—मदनबाधेचा मोठा अग्नि ज्याचे मनांत असतो त्याचें ब्रह्मचर्य व सदाचाररूप वृक्ष जळून खाक होतात.

ब्रह्मचर्यमयि पालय सारं ॥
धर्मसारगुणदं भवतारं ॥
स्वर्गमुक्तिसुखसाधनहेतुं ॥
दुःखसागरविलंघनसेतुं ॥ ४१ ॥

म. अर्थ—अरे, उत्तम रीतीच्या ब्रह्मचर्यास पाळ, ब्रह्मचर्य धर्माचें उत्तम फळ देणारें आहे, संसारांतून तारणारें आहे, स्वर्ग, मोक्ष वगैरे सुखांस कारण आहे, दुःखसमुद्र ओलांडण्याविषयीं सेतु आहे.

ब्रह्मचर्यविकलो हि यो नरो ॥
यत्र तत्र सकलैर्विनिंदितः ॥
दुःखशोकवधबंधनं खलु ॥
प्राप्य गच्छति ततोप्यधोगतिं ॥ ४२ ॥

म. अर्थ—जो मनुष्य ब्रह्मचर्य पाळीत नाहीं त्याची सर्वजण जागोजाग अप्रतिष्ठा करितात, तो मनुष्य दुःख, शोक, वध, कैद वगैरे भोगून मरणानंतर नरकास जातो.

संसारांबुधितारकं सुखकरं देवैः सदा पूजितं ॥
मुक्तिद्वारमपारपुण्यजनकं धीरैः सदा सेवितं ॥
सम्यग्दर्शनबोधवृत्तगुणसद्भांडं पवित्रं परं ॥
चात्रामुत्र हि सौख्यगेहमपरं त्वं ब्रम्हचर्यं भज ॥४३॥

म. अर्थ—ब्रम्हचर्य हें संसारसमुद्रांत तारक आहे, सुखदायक असून देवांस मान्य आहे, मोक्षाचें द्वार असून अतिशय पुण्य उत्पन्न करणारें आहे, धैर्यवान् लोक त्याचा स्वीकार करितात. सम्यग्दर्शन, ज्ञान, चारित्र इत्यादिगुणांचें भांडार आहे, अतिशय पवित्र आहे, इहलोकीं व परलोकीं सुखाचें अद्वितीय मंदिर आहे, त्या ब्रम्हचर्याचा तूं स्वीकार कर.

शीलव्रतसमायुक्तः पूज्यो नीलीव सोमरैः ॥
निंदनीयो विना तेन प्राणि चारक्षकादिवत् ॥ ४४ ॥

म. अर्थ—शीलव्रत पाळणारा मनुष्य नीलीप्रमाणें देवांस ही पूज्य होतो. व शीलव्रतावांचून असणारा मनुष्य रक्षकाप्रमाणें निंदेस पात्र होतो.

## ॥ अथ परिग्रहत्यजनवर्णनं ॥

परिग्रहग्रहग्रस्तः सर्वं गिलितुमिच्छति ॥
धनं न तस्य संतोषः सरित्पूरमिवार्णवः ॥ ४५ ॥

म. अर्थ—परिग्रहरूप पिशाचानें पीडिलेला मनुष्य सर्व कांहीं गिळंकृत करण्यास पाहतो. समुद्रास जशी नद्यांचे पुरानें तृप्ति होत नाहीं, तशी त्यास द्रव्यापासून तृप्ति होत नाहीं.

परिग्रहमभुक्त्वा यो मुक्तिमिच्छति मूढधीः ॥
खपुष्पैः कुरुते सारं स वंध्यासुतशेखरं ॥ ४६ ॥

म. अर्थ—जो मूर्ख परिग्रहास सोडून दिल्याखेरीज मुक्ति मि-

ळण्याची इच्छा करितो तो वांझेच्या मुलाचे मस्तकास आकाशरूप फुलांनीं सुशोभित करितो.

**द्रव्यं दुःखेन चायाति स्थितं दुःखेन रक्ष्यते ॥**
**दुःखशोककरं पापं धिक् द्रव्यं दुःखभाजनं ॥ ४७ ॥**

म. अर्थ–द्रव्य मिळण्यास श्रम पडतात, घरीं असलेलें सांभाळण्यांत श्रम पडतात, द्रव्य, दुःख व श्रम देणारें पातकच आहे, अशा दुःखकारक द्रव्याला धिक्कार असो.

**शय्याहेतुं तृणादानं मुनीनां निंदितं बुधैः ॥**
**यः स द्रव्यादिकं गृण्हन् किं न निंद्यो जिनागमे ४८**

म. अर्थ–मुनीश्वरांनीं हातरण्याकरितां थोडसें गवत गोळा केलें तरी तें कृत्य विद्वान् निंद्य समजतात. मग जो मुनी पैशे वगैरे घेईल, तो जिनशास्त्रांत निंद्य कां समजला जाणार नाहीं?

**पृथ्वीवृत्तं ॥ परिग्रहमहाभरं सकलदुःखदानाकर–॥**
**मसंख्यभवकारणं मुनिजनैर्मुहुर्निंदितं ॥**
**अनेकगुरुकष्टदं भयवधादिदुःखास्पदं ॥**
**त्यज त्वमपि सर्वदा विपुलमोक्षसौख्याय वै ॥ ४९ ॥**

म. अर्थ–परिग्रहाचें मोठें ओझें सर्वप्रकारच्या दुःखाची खाण आहे, अनेकप्रकारचे जन्म होण्यास कारण आहे, मुनीश्वरांनीं नेहमीं निंदिलेलें आहे, नानाप्रकारचे मोठमोठे कष्ट देणारें आहे, भीति, मरण वगैरे दुःखांस कारण आहे, तुला अक्षय मोक्षसुखाची इच्छा असल्यास तें सोडून दे.

**परिग्रहप्रमाणेन पूजनीयो जयादिवत् ॥**
**प्राणी लोभाकुलो निंद्यः स्यान्मत्स्यनवनीतवत्॥५०॥**

म. अर्थ–प्राणी परिग्रहांचें प्रमाण करील तर जयादिकाप्रमाणें महत्व पावेल, व लोभी असेल तर मत्स्यनवनीताप्रमाणें निंदेस पात्र होईल.

## ॥ अथ वैराग्यस्वीकारवर्णनं ॥

**भोगेनापि विना रागी कर्म बध्नाति केवलं ॥**
**वीतरागो पुनर्भोगं भुंजानोपि विमुच्यते ॥ ५१ ॥**

म. अर्थ–रागी पुरुष विषयसुख न घेतलें तरी कर्म सांचवितो, व वीतराग विषयसुख भोगूनही उद्धरून जातो.

**यस्य चेतसि वामांगी वर्तते दुःखदायिनी ॥**
**तस्य मुक्तिपदप्राप्तिर्न स्वप्नेपि भविष्यति ॥ ५२ ॥**

म. अर्थ–ज्याचे मनांत दुःख देणारी स्त्री राहते, त्याला मोक्षसुख स्वप्नांत देखील मिळत नाहीं. ( नेहमीं परस्त्रीवर लक्ष्य ठेवणाऱ्यास नरक होतो. )

**चक्रवर्त्यादिलक्ष्मीं हि वीतरागो विहाय वै ॥**
**जिनदीक्षां समादत्ते लोभी गेहं न मुंचति ॥ ५३ ॥**

म. अर्थ–वीतराग सार्वभौमाची देखील संपत्ति सोडून देऊन जिनदीक्षा घेतो, लोभी मनुष्याला घर देखील सुटत नाहीं.

**विरागतामनासाद्य दीक्षादानं करोति यः ॥**
**तस्य जन्म वृथा हि स्यादजाकण्ठे स्तनाविव ॥ ५४ ॥**

म. अर्थ–वैराग्य झालें नसून जो मनुष्य दीक्षाग्रहण करितो त्याचें जन्म शेळीचे गळ्यांतील स्तनाप्रमाणें व्यर्थ आहे.

**वैराग्यसारं मुनिवृन्दसेव्यं ॥**
**मुक्त्यंगनादानविधौ समर्थं ॥**
**पापारिवृक्षस्य महाकुठारं ॥**
**सौख्यास्पदं त्वं भज सर्वकालं ॥ ५५ ॥**

म. अर्थ–वैराग्यरूप सद्वस्तु मुनीश्वरांचे समुदायांनीं सेविलेली आहे, मोक्षरूप स्त्रीची प्राप्ति करून देण्यास समर्थ आहे,

पातकरूप वृक्षावर मोठी कुऱ्हाड आहे, सुख देणारी आहे, तिचा तूं सर्वदां स्वीकार कर.

## ॥ अथ गुणिसंगवर्णनं ॥

गुणिनां संगमं प्राप्य निर्गुणोपि गुणी भवेत् ॥
गुणी निर्गुणसंसर्गात्क्षयं नाप्नोति कुत्रचित् ॥ ५६ ॥

म. अर्थ—गुणवानांचा सहवास झाल्यास गुणहीन मनुष्य देखील गुणी होतो. निर्गुणाचे सहवासानें गुणवान् कधींही क्षय पावत नाहीं.

साधुसंगमनासाद्य यो मुक्तरालयं व्रजेत् ॥
तर्ह्यन्धः प्रचलन्मार्गे सत्यं मेरुं समारुहेत् ॥ ५७ ॥

म. अर्थ—सज्जनांचा सहवास केल्यावांचून जर कोणी मोक्षास जात असेल, तर आंधळा देखील वाट चालत चालत मेरु-पर्वतावर चढेल.

विषानलमहासर्पव्याघ्रसंगः कृतो वरं ॥
न च दुर्जनसंसर्गाज्जीवितव्यं धनादिकं ॥ ५८ ॥

म. अर्थ—विषारी मोठ्या सापाचा किंवा वाघाचा सहवास केलेला बरा, परंतु वाईट लोकांच्या सहवासानें जीवंत राहणें किंवा द्रव्य वगैरे कांहीं एक नको.

चोरसंसर्गतो यद्वद्वधबंधादिकं श्रयेत् ॥
तद्वन्नीचप्रसंगेन पापक्लेशवधादिकं ॥ ५९ ॥

म. अर्थ—चोराचे सहवासानें जसें मरण किंवा बंधन प्राप्त व्हावयाचें तसेंच हलकटाचे सहवासानें पाप दुःख मरण वगैरे प्राप्त होतें.

पापं लुंपति धर्मशास्त्रचरणे धत्ते मतिं निश्चलां ॥
वैराग्यं च करोति रागविरतिं सर्वेंद्रियाणां जयं ॥

**शोकक्लेशभयादिदुःखविलयं संसारपारं नयेत् ॥**
**भ्रातस्त्वं कुरु संततं सुखकरं संगं बुधैः सद्व्रतैः ॥६०॥**

म. अर्थ–गुणवानांचा समागम पाप घालवितो, धर्मशास्त्राप्रमाणें आचरण करण्याची बुद्धि देतो, वैराग्य उत्पन्न करितो, विषयसुखाची इच्छा कमी करितो, सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवण्याची शक्ति देतो, शोक, भीति, दुःख वगैरे नाश करितो, संसारांतून तारून नेतो, ह्यास्तव बंधो, तूं व्रतधारी गुणवानांशीं सदोदित स्नेह कर, ह्मणजे तुला सुख होईल.

## ॥ अथ जिनपूजावर्णनं ॥

**गृहव्यापारजं पापं हंति पूजा जिनस्य वै ॥**
**द्रव्यार्जनेन जातं च पुण्यं संजायते तथा ॥ ६१ ॥**

म. अर्थ–जिनेश्वराची पूजा केली तर गृहकृत्यांत लागलेलें व द्रव्य मिळविण्याचे कामांत लागलेलें पातक दूर करून पुण्य उत्पन्न करिते.

**जिनपूजां न यः कुर्यात्समर्थोपि गृही कुधीः ॥**
**पक्षिजन्मसमं ज्ञेयं तस्य जन्म निरर्थकं ॥ ६२ ॥**

म. अर्थ–आंगीं सामर्थ्य असून ही जो दुर्बुद्धि गृहस्थ जिनपूजा करीत नाहीं त्याचें जन्म पक्षिजन्मासारखें व्यर्थ आहे, असें जाणावें.

**कालत्रयेपि यः पूजां करोति जिननायके ॥**
**तीर्थनाथस्य भूतिं स भुक्त्वा मुक्त्यंगनां व्रजेत् ॥६३॥**

म. अर्थ–जो जिनेश्वराची त्रिकाळ पूजा करितो तो तीर्थकराचें ऐश्वर्य भोगून मोक्षपुरास जातो.

**पूजां विना न कुर्येत भोगसौख्यादिकं कदा ॥**
**भव्यैः पूजा जिनेंद्राणां कर्त्तव्या मुक्तिहेतवे ॥ ६४ ॥**

म. अर्थ--पूजेखेरीज विषयोपभोगाचा अनुभव कधीं घेऊं नये, मोक्षप्राप्तिसाठीं भव्यजनांनीं जिनपूजा करावी.

स्वर्गश्रीगृहसारसौख्यजनकां श्वभ्रगृहेष्वर्गलां ॥
पापारिक्षयकारिकां सुविमलां मुक्त्यंगनादूतिकां ॥
श्रीतीर्थेश्वरसौख्यदानकुशलां सद्धर्मसंपादिकां ॥
भ्रातस्त्वं कुरु वीतरागचरणे पूजां गुणोत्पादिकां ६५

म. अर्थ--वीतरागाचें चरणकमलांची पूजा, स्वर्गसुख मिळवून देते, नरक गृहास आडकाठी होते, पातकशत्रूचा नाश करिते, ही निष्पाप असून मोक्षरूपस्त्रीची दूती आहे, तीर्थंकराचे सुखाची प्राप्ति करून देण्यास समर्थ असून धर्म वृद्धिंगत करणारी आहे, सद्गुण उत्पन्न करणारी आहे, हे बंधो, ती पूजा तूं करीत जा.

## ॥ अथ पात्रदानवर्णनं ॥

स्तोकं दानं सुपात्राय दत्तं भूरिगुणं भवेत् ॥
वटबीजं यथा क्षेत्रे तस्मादेयं विवेकिभिः ॥ ६६ ॥

म. अर्थ--चांगल्या पात्राला थोडें दान दिलें तरी वडाचे लहान बियापासून वृक्ष मोठा होतो त्याप्रमाणें पुष्कळ उपयोग करणारें होतें. ह्यासाठीं विचारी मनुष्यानें तें द्यावें.

दृष्टिहीनोपि वारैकं पात्रदानं करोति यः ॥
भोगभूमौ समुत्पद्य सोपि याति सुरालयं ॥ ६७ ॥

म. अर्थ--सम्यग्दर्शन पाळीत नसणारा मनुष्य ही जर एकवेळ पात्रदान करील तर तो देखील भोगभूमीवर जन्म घेऊन स्वर्गास जातो.

पात्रदानेन सद्दृष्टिः स्वर्गं गत्वापि सत्सुखं ॥
चिरं भुक्त्वा सुराज्यं च पश्चाद्गच्छति निर्वृतिं ॥६८॥

म. अर्थ--सम्यग्दर्शन पाळणारा मनुष्य पात्रदानामुळें स्वर्गा-

स जातो, चांगलें सुख भोगून नंतर पृथ्वीवर जन्मून राज्य क-रून मरणानंतर मोक्षास जातो.

**भोगभूमौ समुत्पन्नास्तिर्यंचोपि जिनैर्मताः ॥**
**पात्रदानानुमोदेन तस्माद्देयं सुभावतः ॥ ६९ ॥**

म. अर्थ—पात्रदानास अनुमोदन दिल्यामुळें पशुपक्षी देखील भोगभूमीवर जन्म घेतात, व जिनास मान्य होतात, म्हणून वास्तव भक्तिभावानें पात्रदान करावें.

**अतुलगुणनिधानं स्वर्गमोक्षैकमार्गं ॥**
**सकलसुखसमुद्रं पापवृक्षानलं वै ॥**
**स्वपरगुणनिदानं सर्वसाधूपकारं ॥**
**कुरु मुनिजनदानं त्वं सदा मुक्तिहेतोः ॥ ७० ॥**

म. अर्थ—मुनिलोकांस पात्रदान करणें हें कृत्य अमर्याद गुणांचा ठेवा आहे, स्वर्गाचा व मोक्षाचा एक मार्ग आहे, सर्व प्रकारच्या सुखांचा समुद्र आहे. पातकरूप वृक्षास अग्नि आहे, आपल्या व दुसऱ्यांच्या गुणांस कारण आहे, सर्व साधूंच्या उपयोगीं पडणारें आहे, अशारीतीचें पात्रदान तूं मोक्षप्राप्तीचे इच्छेनें कर.

## ॥ अथ कुपात्रत्यजनवर्णनं ॥

**अपात्रदानजं दोषं वक्तुं शक्नोति ? को बुधः ॥**
**दृषन्नौसदृशं ज्ञेयं तदारूढो निमज्जति ॥ ७१ ॥**

म. अर्थ—अपात्रास दान दिल्याचें पाप कोणता शहाणा वर्ण-न करूं शकल ? तें कृत्य दगडाचे नौकेसारखें समजावें, त्यांत बसणारा बुडतोच.

**स्वातिनक्षत्रजं नीरं शुक्तिकायां च मौक्तिकं ॥**
**विषं सर्पमुखे यद्वत्तद्वद्दानं बुधैः स्मृतं ॥ ७२ ॥**

म. अर्थ—स्वाती नक्षत्रांतील पावसाचें पाणी शिंपेंत मोती

होतें व सापाचे तोंडांत विष होतें, त्याप्रमाणें दानाची स्थिति विद्वानांनीं मानिली आहे.

अन्धकूपे वरं क्षिप्तं पदं निर्नाशहेतवे ॥
नास्मिन् कुपात्रमार्गे तु यतो दुस्तरपापकृत् ॥ ७३ ॥

म. अर्थ–अंधकूपांत आपला नाश व्हावा म्हणून पाऊल ठेवलेलें वरें, परंतु त्या कुपात्ररूप मार्गांत पाऊल ठेवणें नको, कांतर त्यापासून दुस्तर पाप लागतें.

मेघनीरं यथा भूमिमिक्षुर्निंबादिकं भवेत् ॥
प्राप्य दानं तथा ज्ञेयं पात्रापात्रेषु योजितं ॥ ७४ ॥

म. अर्थ–पावसाचें पाणी जशा रीतीच्या जमीनीवर पडलें तसा गुण करितें, उंसांच्या मळ्यांत पडल्यास उंस वाढवितें, निंबांच्या वनांत पडल्यास निंब वाढवितें, त्याप्रमाणें पात्रास व अपात्रास दिलेलें दान बरा वाईट गुण करितें.

गोस्वर्णगजवाजिभूमिमहिलादासीतिलस्यंदनं ॥
सुस्नेहं प्रतिदत्तमत्र दशधा दानं शठैः कीर्तितं ॥
तद्दाता कुगतिं व्रजेच्च पुरतो हिंसाद्यसद्वर्त्तना–॥
द्दानेनापि च तत्सदा त्यज बुधैर्निंद्यं कलंकास्पदं ७५

म. अर्थ–गाय, सुवर्ण, हत्ती, घोडा, भूमि, स्त्री, दासी, तीळ, रथ, गोडेंतेल वगैरे दहा प्रकारचें दान मूर्खांनीं वर्णिलें आहे, हिंसा वगैरे कृत्यामुळें हीं दानें देणारा दाता अगोदर नरकास जाईल, ह्यास्तव ज्ञात्यांस अमान्य व कलंक लाविणारें असें हें दान तूं करूं नकोस.

देही सुपात्रदानेन जिनेंद्रादिपदं भजेत् ॥
श्रीषेणनृपवद्भोग्यं कुदानान्निंदितां गतिं ॥ ७६ ॥

म. अर्थ—मनुष्य सुपात्रदानानें जिनेश्वराचें पद पावतो, श्रीषेणराजाप्रमाणें ऐश्वर्य भोगितो, व कुदानानें अधोगतीस जातो.

## ॥ अथ चैत्यालयादिकरणवर्णनं ॥

अंगुष्ठमात्रं जिनदेवबिंबं ॥
करोति यो नित्यसमर्चनाय ॥
अनेकजन्मार्जनपुण्यहेतुं ॥
महत्सुपुण्यं लभते स भव्यः ॥ ७७ ॥

म. अर्थ—जो भव्यजीव नित्यपूजेकरितां अंगुष्ठभर उंचीची जिनप्रतिमा करितो त्यास अनेक जन्मांत पुण्य लागतें.

जिनेश्वरस्य सद्बिंबं नास्ति यस्मिन्गृहे बुधैः ॥
पक्षिगेहसमं ज्ञेयं पापदं कथितं सदा ॥ ७८ ॥

म. अर्थ—ज्या घरांत जिनेश्वराची प्रतिमा नाहीं, तें घर पांखराच्या घरट्या सारखें पातकी समजावें, असें ज्ञाते लोक मानितात.

श्रीजिनेश्वरबिंबस्य यः प्रतिष्ठां करोति सः ॥
तीर्थराजस्य संभूतिं लब्ध्वा मुक्तिवरो भवेत् ॥ ७९ ॥

म. अर्थ—श्रीजिनाचे मूर्तीची जो प्रतिष्ठा करितो तो तीर्थंकर पदास पाऊन मोक्षास जातो.

स संघाधिपतिर्ज्ञेयो यः प्रतिष्ठां करोति वै ॥
यस्तु तां कारयेत्सोपि विज्ञेयश्च तथाविधः ॥ ८० ॥

म. अर्थ—जो जिनेश्वराचे मूर्तीची प्रतिष्ठा करितो, तो संघाचा मुख्य जाणावा, व जो करवितो तो देखील त्याच योग्यतेचा समजावा.

सर्वजीवोपकारत्वात्सद्धर्माकरवर्धनात् ॥
न प्रतिष्ठासमं पुण्यं विद्यते गृहिणां क्वचित् ॥ ८१ ॥

म. अर्थ–सर्व प्राणीमात्रांवर उपकार होऊन सद्धर्माची वृद्धि होते ह्या करितां गृहस्थांस प्रतिष्ठेसारखें कांहीं दुसरें पुण्य नाहीं.

चैत्यालयं यः कुरुते जिनस्य ॥
विसंख्यजीवार्जनपुण्यहेतुं ॥
न शक्यते तस्य फलं वचोभि- ॥
र्वक्तुं बुधैर्धर्मकरं वृषाढ्यं ॥ ८२ ॥

म. अर्थ–अनेक जीवांचें पुण्य वृद्धिंगत करण्यास कारण असें जिनेश्वराचें मंदिर जो कोणी करितो त्याचें फळ वर्णन करण्यास मोठमोठ्या ज्ञात्यांची ही शक्ति नाहीं. त्या कृत्यानें पुण्य होऊन धर्म वृद्धिंगत होतो.

केचित्पुण्यमुपार्जयंति गुणिनः पूजादिभिः प्रत्यहं ॥
केचित्संस्तुवते परेपि मनुजाः पश्यंति नृत्यंति च ॥
श्रीचंद्रोपकधूपदीपकलशान् भृंगारघंटादिकान् ॥
दत्वा तत्र मुनीश्वराश्रयपराः स्याद्यत्र चैत्यालयं ८३

म. अर्थ–जेथें जिनमंदिर असेल तेथें कितीएक भव्य जीव नित्य पूजा करून पुण्यसंग्रह करितात, कोणी मनुष्य स्तुति करितात, कोणी दर्शन घेतात, कोणी नाचतात, कोणी चांदवे, धूप, दीप, कलश, घंटा वगैरे उपकरणें देऊन मुनीश्वराची भक्ति करितात.

चंद्रोपकं जिनेंद्रस्य दत्ते यः पुण्यहेतवे ॥
एकछत्रं हि सद्राज्यं स लब्ध्वा निर्वृतिं व्रजेत्८४

म. अर्थ–जो कोणी पुण्य होण्यास्तव जिनमंदिरांत चांदवा देईल त्यास सार्वभौम राज्य मिळून तो मुक्तीस जाईल.

घंटां श्रीजिनदेवस्य दत्ते यः पुण्यहेतवे ॥
घंटादिसहितं यानं प्राप्य मुक्तिवरो भवेत् ॥ ८५ ॥

म. अर्थ—पुण्य उपार्जन होण्यासाठीं जो जिनमंदिरांत घंटा बांधितो, त्यास घंटा बांधलेलें विमान मिळून तो मोक्षास जातो.

यो ज्ञानदानं कुरुते मुनीनां ॥
देवस्य लोके स सुखं प्रभुक्त्वा ॥
राज्यं च सत्केवलबोधभूमिं ॥
लब्ध्वा स्वयं मुक्तिपदं च गच्छेत् ॥ ८६॥

म. अर्थ— जो मुनीश्वरांस ज्ञानदान देतो तो स्वर्गलोकांत सुख भोगून पृथ्वीवर राज्य करून केवलज्ञान होऊन मोक्षास जाईल.

औषधं यो मुनीनां हि दत्ते पुण्यकरं बुधः ॥
देवलोके सुखं भुक्त्वा कर्म रागादिकं क्षिपेत् ॥ ८७॥

म. अर्थ— जो ज्ञानी मुनीश्वरांस औषध देतो, त्यास पुण्य लागून स्वर्गलोकांत सुख भोगून त्याच्या कर्मांचा नाश होतो.

सर्वजीवेषु यो दत्ते अभयं सत्वमौषधं ॥
स संसारसुखं प्राप्य स्थानं गच्छति निर्भयं॥८८॥

म. अर्थ—सर्व प्राणीमात्रांस जो अभय व पुष्टिकारक औषध देतो तो संसारसुख भोगून निर्भय मोक्षस्थलास जातो.

किं जीवितेन कृपणस्य धनेन लोके ॥
पूजादिदानरहितस्य च बद्धकस्य ॥
पापस्य तस्य पुरतो बहुरोगशोक—॥
क्लेशादिदुःखसहिता कुगतिर्ध्रुवं स्यात् ॥ ८९ ॥

म. अर्थ--पूजा, दान न करणाऱ्या व कवडीचुंबक अशा कृपणाच्या जिवंतपणास तरी काय करावयाचें? व द्रव्यास तरी काय करावयाचें? ह्या पातकामुळें तो मरणानंतर नानाप्रकारचे रोग, शोक, कष्ट वगैरे यातना भोगून खरोखर नरकास जाईल.

वरं दरिद्रं न च दानहीनं ॥
धनं महामोहकरं दुरंतं ॥
पापस्य बीजं नरकस्य हेतुं ॥
दुःखाकरं दुर्गतिदानदक्षं ॥ ९० ॥

म. अर्थ—दारिद्र्य बरें, परंतु मोहांत पाडणारें, वाईट परिणाम करणारें, पातकाचें मूळ, नरकाचें साधन, दुःखाची खाण व कष्ट देण्याविषयीं समर्थ असें दानहीन धन नको.

श्रीतीर्थेश्वरबिंबसारकरणे चैत्यालयोद्धारणे ॥
श्रीसिद्धान्तसुलेखने मुनिजने दाने प्रतिष्ठादिके ॥
भव्यैर्यैः स्वधनं स्वधर्मकरणे दत्तं जिनार्चादिके ॥
धन्यास्ते परलोकसाधनपरा वंद्याजनैर्भूतले ॥ ९१ ॥

म. अर्थ—श्री जिनाजी मूर्ति स्थापन करण्यांत, जिनमंदिराचा जीर्णोद्धार करण्यांत, श्रीसिद्धांताचीं पुस्तकें लिहिण्यांत मुनिजनाचे उपयोगांत, दानांत, प्रतिष्ठा वगैरे कामांत, धर्मबुद्धिचे कामांत, जिनपूजनांत वगैरे ज्यांनीं आपलें द्रव्य खर्च केलें ते भव्य जीव धन्य असून मोक्षाची तयारी करणारे असल्यानें जगांत पूज्य होत.

भेकः स्वर्गेऽमरो जातः जिनानां पूजनेच्छया ॥
चैत्यचैत्यालयं कुर्यात्किं फलं तस्य वेद्मि न ॥ ९२ ॥

म. अर्थ—जिनपूजनाची मनांत इच्छा धरल्यानें बेडूक देखील स्वर्गांत देव झाला, मग जो भव्य जीव जिनबिंबप्रतिष्ठा व जिनमंदिरें करीत असेल त्याचें फळ काय होत असेल तें मला समजत नाहीं.

## ॥ अथ भावनावर्णनं ॥

तपः पूजासुदानानि भावनासहितानि वै ॥
मोक्षवृक्षस्य बीजानि नान्यथा संति मुक्तये ॥ ९३ ॥

म. अर्थ—तप, पूजा, सुदान हीं भावना ( भक्ति ) धरून केलीं तरच तीं मोक्षरूपवृक्षाचीं बीजेंच होतात. ( मोक्षास नेतात ) नाहींपेक्षां होत नाहींत.

भावहीनस्य पूजादितपोदानजपादिकं ॥
व्यर्थं दीक्षादिकं च स्यादजाकण्ठे स्तनाविव ॥ ९४॥

म. अर्थ—भाव ( भक्ति ) नसणाऱ्याची पूजा, तप, दान जप दीक्षा वगैरे शेळीचे गळ्यांतील स्तनाप्रमाणें व्यर्थ होत.

भावनासहितः प्राणी चरणज्ञानविच्युतः ॥
स्वर्गादिकसुखं प्राप्य भवेन्मुक्तिवधूवरः ॥ ९५ ॥

म. अर्थ—भक्तिवान् मनुष्य चारित्र व बोधरहित असला तरी स्वर्गसुख भोगून मोक्षास जातो.

भावे दानं व्रतं पुण्यं सौख्यं धर्मः प्रकीर्तितः ॥
तस्माद्भावः शुभः कार्यः किं वृथा देहदण्डनैः ॥९६॥

म. अर्थ—भक्तिमध्येंच दान, व्रत, पुण्य, सुख, धर्म वगैरे असतात, ह्यास्तव चांगली भावना करावी, व्यर्थ शरीर झिजविण्यांत काय अर्थ आहे?

संसारांबुधितारकां सुखकरां मुक्त्यंगनाधात्रिकां ॥
स्वर्गद्वारविवेशमार्गकुशलां पापारिनाशंकरां ॥
सद्धर्मामृतवापिकां सुविमलां रत्नत्रयोत्पादिकां ॥
भ्रातस्त्वं कुरु भावनां प्रतिदिनं श्रीधर्मकल्पद्रुमां॥९७॥

म. अर्थ—भावना ही संसारसमुद्रापासून तारणारी आहे, सुखदायक आहे, मोक्षरूपस्त्रीची उपमाता आहे, स्वर्गाच्या द्वारांत नेण्याचे कामांत कुशल आहे, पातक शत्रूंचा नाश करणारी आहे, सद्धर्मरूप जलाची विहीर आहे, निष्पाप आहे, रत्नत्रयांस उत्पन्न करणारी आहे, धर्माविषयीं केवळ कल्पवृक्ष आहे, ह्यासाठीं बंधो तूं दररोज भावना धर.

## ॥ अथ रात्रिभोजनत्यजनवर्णनं ॥

**दंशकीटपतंगादिजीवराशिप्रभक्षणात् ॥**
**आमिषाशिसमो ज्ञेयः रात्रिभोजनलोलुपः ॥९८॥**

म. अर्थ—माशी, किडा, पतंग वगैरे जीवसमुदायांच्या भक्षणामुळें रात्रीं जेवण करणारा मनुष्य मांसभक्षकाप्रमाणें समजावा.

**कुष्टपित्तप्रकोपादिसर्वरोगकदंबकं ॥**
**इहामुत्र कुयोनिं च लभते रात्रिभोजनात्॥९९॥**

म. अर्थ—रात्री जेवल्यानें मनुष्यास येथें कोड, पित्त प्रकोप वगैरे सर्व प्रकारचे रोग होतात, व मरणानंतर तो वाईट गतीस जातो.

**पशुरेव स विज्ञेयो भुंक्ते रात्रौ हि यो नरः ॥**
**अन्तरं न हि तस्यान्यदष्टौप्रहरभक्षणात् ॥ २०० ॥**

म. अर्थ—जो मनुष्य रात्रीं जेवतो तो जनावर समजावा, कांतर अष्टौप्रहर ( नेहमीं ) जेवणामुळें जनावरांत व त्याच्यांत अंतर नाहीं.

**रात्रौ योग्यं न नीरं स्यात्पातुं जीवाद्यदर्शनात् ॥**
**कथं च भोजनं भक्ष्यं पत्रपूगीफलादिकं ॥ १ ॥**

म. अर्थ—जीवजन्तु दिसत नसल्यानें रात्रीं पाणी पिणें देखील योग्य नाहीं, मग जेवण व पानसुपारी वगैरे खाणें योग्य कसें होईल ?

**ये रात्रौ सर्वमाहारं वर्जयंति बुधोत्तमाः ॥**
**तेषामर्धोपवासस्य फलमुक्तं जिनेश्वरैः ॥ २ ॥**

म. अर्थ—जे समंजस लोक रात्रीं जेवण करीत नाहींत. त्यांस अर्ध उपवासाचें श्रेय आहे असें जिनेश्वरांनीं म्हटलें आहे.

अंधाः कुब्जकवामनातिविकला अल्पायुषः प्राणिनः॥
शोकक्लेशविषाददुःखबहुलाः कुष्टादिरोगान्विताः॥
दारिद्र्योपहता अतीवचपला मन्दा नराः स्युर्ध्रुवं ॥
रात्रौ भोजनलंपटाः परभवे श्वभ्रालये कीटकाः ॥ ३ ॥

म. अर्थ–रात्रीं जेवणारे लोक आंधळे, कुबडे, खुजे, विद्रूप अल्यायुष, दुःखी, कष्टी, कुष्टी, दरिद्री अतिशय चंचल मनाचे, जडबुद्धि असे होतात, व दुसऱ्या भवांत नरकांत कीटक होतात.

## ॥ अथ गृहत्यजनवर्णनं ॥

नारीशृंखलसंबद्धः पुत्रपाशेन वेष्टितः ॥
मोहांधः संचरन्गेहे कारागारेऽवतिष्ठति ॥ ४ ॥

म. अर्थ–स्त्रीरूप बिडी हातांत पडलेला, पुत्ररूप पाशांत सांपडलेला, मोहानें आंधळा झालेला, गृहांत राहणारा प्राणी कैदेंत असलयाप्रमाणें असतो.

करोत्यहर्निशं पापं पुण्यं कर्त्तुं प्रभुर्न यः ॥
कामांधस्तस्य किं न स्यान्मज्जनं दुःखसागरे ॥५॥

म. अर्थ–रात्रंदिवस पाप करितां पुण्य करण्यास जो समर्थ नाहीं, असा विषयलंपट मनुष्य असल्यावर त्याला दुःख समुद्रांत बुडावें लागणार नाहीं काय?

वरं पातो महावन्हौ न मोहाग्नौ च दुःसहे ॥
एकवारं दहेद्वन्हिर्मोहाग्निरसकृत्पुनः ॥ ६ ॥

म. अर्थ–मोठ्या विस्तवांत उडी टाकलेली बरी, परंतु मोहाग्नीचे झपाट्यांत सांपडणें नको, विस्तव एक जन्मांत जाळील परंतु मोहाग्नि अनेक जन्मांत वारंवार जाळील.

येषां न पूजा जिनपुंगवस्य ॥
दानं न शीलं न तपो जपश्च ॥

धर्मो न सारं गुरुसेवनं च ॥
गेहे वृथा ते वृषभाश्चरंति ॥ ७ ॥

म. अर्थ–ज्यांना जिनेश्वराची पूजा करणें नको, दान देणें नको, शील पाळणें नको, जप नको, धर्म नको, चांगल्या रीतीची गुरूची भक्ति नको, ते घरांत व्यर्थ बैलाप्रमाणें फिरतात.

दुःखाकरं दुर्गतिदानदक्षं ॥
पापस्य मूलं गुणधर्मशत्रुं ॥
मोहस्य मित्रं परमार्थशून्य-॥
मसारकं त्वं त्यज भो नु गेहं ॥ ८ ॥

म. अर्थ–गृह हें दुःखाची खाण आहे, वाईट योनि देण्यास तत्पर आहे. पातकाचें मूळ आहे, सद्गुणाचा व धर्माचा शत्रु आहे, मोहादिकांचा मित्र आहे, ह्यानें परमार्थ साधत नाहीं हें तुच्छ आहे, ह्यास्तव मित्रा तूं ह्या गृहाचा त्याग कर.

## ॥ अथ देहवैराग्यवर्णनं ॥

सप्तधातुमये देहे रोगप्रचयपूरिते ॥
को ज्ञानी रमतेऽसारे दुर्गन्धेऽमेध्यमंदिरे ॥९॥

म. अर्थ–सात प्रकारच्या धातूंनीं भरलेल्या, रोगांच्या समुदायांनीं व्यापिलेल्या, तुच्छ, घाण, अपवित्रतेचें मंदिर अशा देहांत कोणता शहाणा सुख मानील?

अनेकवस्त्रताम्बूलैरन्नपानैश्च पोषितं ॥
जीवेन सह नो याति शरीरं दुर्जनादिवत् ॥१०॥

म. अर्थ–नानाप्रकारचें वस्त्र विडे, अन्न, पिण्याचे पदार्थ ह्यांनीं पुष्ट केलें तरी हें शरीर दुष्टाप्रमाणें जीवाबरोबर येत नाहीं.

तैरेव सफलं चक्रे यैः शरीरं कदर्थितं ॥
वर्ज्यं च कामभोगेषु तपश्चारित्रसिद्धये ॥ ११ ॥

म. अर्थ—हें कुत्सित शरीर तपश्चर्येची व चारित्राची प्राप्ति होण्यासाठीं ज्यांनीं विषयोपभोगाकडे लाविलें नाहीं त्यांनींच सफळ केलें.

**देहं पुष्यति यो मूढो मिष्टं तस्य प्रयच्छति ॥**
**अत्रामुत्र घनं रोगं दुर्गतिं याति निश्चितं ॥ १२ ॥**

म. अर्थ—जो मूर्ख दररोज गोडगोड पदार्थ शरीरास अर्पण करून त्यास पुष्ट करितो, त्यास येथें रोग होतो व मरणानंतर तो खचीत नरकास जातो.

**शुक्राच्छोणितसंभवेऽशुचिगृहे देहे कृतांतास्पदे ॥**
**रोगक्लेशविषाददुःखजनके पापाकरेप्यस्थिरे ॥**
**कामक्रोधतृषादिवन्हितापिते रागं विधत्ते ? सुधीः॥**
**को धर्मं प्रविहाय सौख्यजनकं दुःखाय पापाय च॥१३॥**

म. अर्थ—रेतापासून रक्तांत उत्पन्न होणारें, मळिनपणाचें घर, यमाचें मंदिर, रोग, क्लेश, दुःख उत्पन्न करणारें, पातकाची खाण असून ही क्षणभंगुर, काम क्रोध तृषा वगैरे विस्तवांनीं तापलेलें असें हें शरीर असल्यामुळें सुखकारक धर्म सोडून दुःखास्तव व पापास्तव कोणता शहाणा या शरीरावर ममता करील?

## ॥ अथ संसारवैराग्यवर्णनं ॥

**तिलोपमं सुखं प्राप्य दुःखं मेरुसमं भजेत् ॥**
**मूढः संसारकान्तारे दुःखव्याघ्रादिसंकुले ॥ १४ ॥**

म. अर्थ—मूर्ख मनुष्य दुःखरूप वाघांनीं व्यापिलेल्या संसाररूप अरण्यांत तिळाएवढें सुखभोगून मेरुपर्वता एवढें दुःख भोगितो.

**मानुष्यं दुर्लभं प्राप्य सुखे संसारसम्भवे ॥**
**रतिं कृत्वा वृथा मूढो दुःखं धार्यति दुःस्सहं ॥ १५ ॥**

म. अर्थ—दुर्मिळ मनुष्यजन्म प्राप्त झाला असून मूर्ख मनुष्य संसारांत उत्पन्न होणाऱ्या सुखावर प्रीति करून दुःसह दुःख भोगितो. ( दुर्मिळ मनुष्य जन्माचा दुरुपयोग करूं नये. )

**संसारसागरे घोरे दुःसहे विषमे चले ॥**
**धर्मनावं समारुह्य गच्छ त्वं परमां गतिं ॥ १६ ॥**

म. अर्थ—भयंकर, सहन न होणाऱ्या, अतिशय दुःख देणाऱ्या, क्षणभंगुर अशा ह्या संसारसमुद्रांत धर्मरूप नौकेंत बसून तूं उत्तम गतीस जा.

**संसारे मन्यते सौख्यं मूढ इंद्रियगोचरं ॥**
**दुःखं तदेव जानाति ज्ञानी पापारिवर्धनात् ॥ १७ ॥**

म. अर्थ—संसारांत मूर्ख मनुष्य इंद्रियांचे सुखास सुख मानितो व ज्ञानी मनुष्य पातकरूप शत्रूची वृद्धि होईल म्हणून त्या इंद्रियसुखास च दुःख मानितो.

**रागद्वेषमहज्जलेतिविषमे दुःखादिगर्तान्विते ॥**
**शोकक्लेशभयादिमीनबहुले व्याध्यादिभंगाकुले ॥**
**मृत्यूत्पत्तिभयानकेऽतिचपले संसारघोरार्णवे ॥**
**प्राणी मज्जति धर्मनौविरहितो मोहारिबद्धो वृथा १८**

म. अर्थ—संसाररूप भयंकर समुद्र असून त्यांत रागद्वेष हा पाण्याचा पूर आहे, हा समुद्र फार भयंकर आहे, दुःख वगैरे ह्यांत भोंवरे आहेत, शोक, क्लेश, भीति वगैरे ह्यांत मासे आहेत. शरीरव्याधि वगैरे लाटा आहेत, जन्म व मरण ह्यामुळें हा फार भयंकर आहे, हा क्षणभंगुर आहे. ह्या संसारसमुद्रांत अज्ञानरूप शत्रूनें बद्ध केलेला जीव धर्मरूप नौका नसल्यामुळें व्यर्थ बुडतो.

## ॥ भोगत्यजनवर्णनं ॥

व्याघ्रचौरारिसर्पाग्नितीव्ररोगविषाणि च ॥
एकस्मिन्ददते दुःखं भोगाः संख्यातिगं भवं ॥ १९ ॥

म. अर्थ– वाघ, चोर, शत्रु, साप, विस्तव, भयंकर रोग, विष, वगैरे एका जन्मांत दुःख देतात, परंतु विषयोपभोग अनेक जन्मांत दुःख देतात.

पंथानौ द्वौ न गम्येते पथिकेन यथा तथा ॥
यद्यक्षसुखमत्यक्षं सुखं न स्यात्कदाचन ॥ २० ॥

म. अर्थ–मार्गस्थाच्यानें दोन मार्ग जसे एकदम चालवत नाहींत, तसें इंद्रियसुख जर सोडिलें नाहीं, तर खरें सुख कधीं ही होणार नाहीं.

प्रार्थयंति न सद्भोगानिंद्रचक्रादिगोचरान् ॥
कच्चिद्भोगान्समीहन्ते ? मुनयः पापवर्धनात् ॥ २१ ॥

म. अर्थ–पापाची वृद्धि होईल ह्या भीतीनें मुनीश्वर इंद्राचें राज्य, सार्वभौमाचें राज्य वगैरे विषयोपभोगांस देखील इच्छीत नाहींत, मग भोगाची इच्छा कसे करतील ?

नैवं भोगं त्यजेद्यस्तु मुद्रां गृण्हाति केवलां ॥
तपोध्ययनमौनादि सर्वं तस्य वृथा श्रमैः ॥ २२ ॥

म. अर्थ–जो भोगास सोडीत नाहीं परंतु जिनमुद्रा ( दीक्षा ) मात्र घेतो त्याचें तप, अध्ययन, मौन वगैरे सर्व श्रम व्यर्थ आहेत.

दुरितकुरुहकंदं दुःखसंतापबीजं ॥
विषमनरकमार्गं धर्मवृक्षानलं च ॥
विकलकरमसारं दुःखपूर्वं त्यज त्वं ॥
सुरनरमुनिनिंद्यं सर्वभोगं सुखघ्नं ॥ २३ ॥

म. अर्थ—विषयोपभोग हा पातकरूप वृक्षाचा गड्डा आहे, दुःखाचें व संतापाचें बीज आहे. भयंकर नरकाचा मार्ग आहे, धर्मरूप वृक्षावर अग्नि आहे, दुःखदायक असून तुच्छ आहे, देव मनुष्य मुनीश्वर ह्यांनीं निंदिलेला आहे, अशा ह्या निंद्य आणि सुखनाशक भोगास तूं सोडून दे.

## ॥ धीरत्ववर्णनं ॥

बाणवृष्टिसमाकीर्णे रणे तिष्ठंति भूभुजः ॥
योषित्कटाक्षसंग्रामे न च धीरा मुनीश्वराः ॥ २४ ॥

म. अर्थ—बाणांची वृष्टि होणाऱ्या भयंकर युद्धांत राजे धैर्य धरितात, परंतु स्त्रियांच्या नेत्रकटाक्षांचे युद्धांत त्यांचें धैर्य चालत नाहीं. मुनीश्वर मात्र स्थिर असतात.

परीषहकषायादिजये शूरास्तथेंद्रिये ॥
मदने कर्मसंताने भवंति न च संगरे ॥ २५ ॥

म. अर्थ—उपसर्ग, कषाय वगैरे सहन करण्यांत, इंद्रियें स्वाधीन ठेवण्यांत, विषयवासना ज्यास्त वाढूं न देण्यांत, कर्मांची निर्जरा करण्यांत जे शूर असतील ते शूर होत, लढाईत पराक्रम करणारे शूर नव्हत.

हस्तिव्याघ्रारिचौराणां संति शूरा विदारणे ॥
बहवस्ते न दृश्यन्ते ये कामारिनिपातकाः ॥ २६ ॥

म. अर्थ—हत्ती, वाघ, शत्रु, चोर मारणारे शूर पुष्कळ दिसतात, परंतु कामरूप शत्रूस मारणारे कोणी येथें दिसत नाहींत.

घोरोपसर्गसंतापे व्याघ्रदुष्टजनैः कृते ॥
न त्यक्तं सत्वसाम्राज्यं यैश्च तेषां नमोनमः ॥ २७ ॥

म. अर्थ—वाघ आणि दुष्टलोक ह्यांनीं केलल्या भयंकर पी-

डेस व दुःखास न जुमानतां ज्यांनीं धीटपणा सोडिला नाहीं. त्या मुनीश्वरांस नमस्कार असो.

धीरत्वं भज सर्वकालमयि भो घोरोपसर्गे सति ॥
संसाराम्बुधितारकं शुभकरं पापारिविध्वंसकं ॥
मुक्तिश्रीगृहमाग्रिमं मुनिजनैः सेव्यं सदा सौख्यदं ॥
संख्यातीतगुणैकगेहमसमं लौल्यं त्यज त्वं सदा॥२८॥

म. अर्थ–हे मित्रा, तूं भित्रेपणा सोडून दे, भयंकर उपसर्ग झाला तरी तूं धैर्याचा आश्रय कर ( धैर्य धर ) धैर्य संसारसमुद्रास तारक आहे, कल्याण करणारें आहे, पातक शत्रूचा नाश करणारें आहे, मोक्षलक्ष्मीचें मुख्य घर आहे, मुनीश्वरांनीं नेहमीं अनुभवलेलें असून सुखदायक आहे, अमर्याद गुणांचें घर आहे, ज्याला उपमा नाहीं.

## ॥ शोकत्यजनवर्णनं ॥

मृते स्वजनमात्रेऽपि यः शोकं कुरुते सुधीः ॥
आत्मानं तेन किं ज्ञातं ? जरामरणविच्युतं ॥ २९ ॥

म. अर्थ–आपला नातलग वगैरे कोणी मरण पावल्यास जो बुद्धिमान् दुःख करितो, तो आपणास जन्ममरण विरहित असें मानितो काय ?

यस्मिन्नहनि संजातस्तदारभ्य दिनं प्रति ॥
नीयते यमगेहं हि प्राणी कर्मारिभिर्बलात् ॥ ३० ॥

म. अर्थ–ज्या दिवशीं प्राणी जन्मास आला त्या दिवसापासून नित्य कर्मशत्रु त्यास यमाचे घरीं सक्तीनें नेण्यास पहातच असतात.

शोकं करोति यो मूढो मृतो नहि मरिष्यति ॥
शोभते स न चान्यत्र पुत्रादारादिके मृते ॥ ३१ ॥

म. अर्थ—नातलग मरण पावल्यास जो मनुष्य दुःख करतो तो मेला नाहीं काय! मरणार नाहीं काय? ह्यास्तव दुसऱ्याचे मरणाबद्दल दुःख करणें शोभत नाहीं.

मूढः शोकाकुलो भूत्वा धर्मपूजादिकं त्यजेत् ॥
बुध इष्टवियोगेन संवेगाद्धर्ममाचरेत् ॥ ३२ ॥

म. अर्थ—मूर्ख मनुष्य दुःखानें पीडित होऊन धर्म पूजा वगैरे सोडितात, ज्ञानी इष्टमित्राच्या मरणानें मनांत वैराग्य होऊन धर्ममार्गानें आचरण करितो.

कुगतिगमनमार्गं दुःखसंतापहेतुं ॥
स्वजनधनवियोगात्संभवं पापबीजं ॥
विबुधजननिंद्यं सौख्यकक्षानलं भो ॥
त्यज कुरु जिनधर्मं त्वं सदा बंधुशोकं ॥ ३३ ॥

म. अर्थ— नातलग मेल्याचें दुःख करणें हें कृत्य नरकास जाण्याचा मार्ग आहे, दुःखाला व संतापाला कारण आहे, हें दुःख आपलें द्रव्य हरवलें किंवा नातलग मेल्यास उत्पन्न होतें, पातकास मूळ आहे, विद्वान् लोकांनीं निंदिलेलें असून सुखावर केवळ विस्तवासारखें आहे, त्या नातलगांचे मरणाचे शोकास सोडून देऊन तूं जिनधर्माचा स्वीकार कर.

## ॥ नीरस्नानत्यजनवर्णनं ॥

मद्यकुम्भो यथा शुद्धो न स्याद्धौतः सरिज्जलैः ॥
स्नानेनापि तथा जीवो मिथ्यात्वादिमलीमसः ॥३४॥

म. अर्थ— दारूची घागर वरून नदीच्या पाण्यांनीं धुतली तरी जशी शुद्ध होत नाहीं, त्याप्रमाणें मिथ्यात्वानें मलिन झालेला आत्मा पाण्याचें स्नानानें शुद्ध होत नाहीं.

घृतकुम्भो यथा शुद्धो मलिनोपि विना जलैः ॥
तथा मुनीश्वरा ज्ञेया ज्ञानचारित्रनिर्मलाः ॥ ३५ ॥

म. अर्थ–तुपाची घागर वरून मलिन असली तरी पाण्यांनीं न धुतांच जशी शुद्ध असते, त्याप्रमाणें ज्ञानानें व चारित्रानें निष्पाप असणारे मुनीश्वर शुद्ध आहेत असें जाणावें.

**नवद्वारैः स्रवद्देहं दुर्गंध्यामेध्यमंदिरं ॥**

**मानयंति जलैः शुद्धं पशवस्ते न मानवाः ॥ ३६ ॥**

म. अर्थ–नऊ छिद्रांनीं वाहणाऱ्या, दुर्गंधाचें व अमंगलाचें केवळ घरच अशा शरीरास जे लोक पाण्यानें स्नान केल्यास शुद्ध मानतात ते पशु नव्हत काय ?

**यः स्नानं कुरुते नित्यं तस्य पापं बुधैः स्मृतं ॥**

**कीटमत्स्याविनाशेन न स्यात्पुण्यं हि मीनवत् ॥ ३७ ॥**

म. अर्थ–जो मनुष्य दररोज पाण्यानें स्नान करितो त्यास पाण्यांतील कीटक व मासे मेल्यामुळें पाप लागतें, असें ज्ञानी लोक मानितात, पाण्यांत नेहमीं मासे आहेत तरी त्यांस जसें पुण्य घडत नाहीं, तसें दररोज स्नान करणाऱ्यास पुण्य नाहीं.

**मंत्रस्नानं तपःस्नानं स्नानं चेंद्रियनिग्रहः ॥**

**सर्वभूतदयास्नानं जलस्नानं च पंचमं ॥ ३८ ॥**

म. अर्थ–मंत्र पाठ करणें हें स्नान होय, तपश्चर्या हें स्नान होय, इंद्रियें स्वाधीन ठेवणें हें स्नान होय, सर्व प्राणीमात्रांवर दया करणें हें स्नान होय. जलानें स्नान करणें हें पांचवें आहे. ( तें व्यर्थ आहे. )

**जलस्नानं गृहस्थानां पूजादिशुभकर्मसु ॥**

**तैलाभ्यंगे मृते धूम्रे मैथुने क्षौरकर्मणि ॥ ३९ ॥**

म. अर्थ–पूजा वगैरे सत्कृत्यें करण्याकरितां गृहस्थांनीं जलस्नान करावें, तसेंच आंगास तेल उटणीं वगैरे लाविल्यास, कोणी मरण पावल्यास, आंग मळलें असल्यास, मैथुन केलें असल्यास किंवा हजामत केली असल्यास जलानें स्नान करावें.

यावत्स्नानं न कुर्वीत तावच्चांडालमुच्यते ॥
ततः स्नानं प्रकर्तव्यं यत्स्नानं शुभकर्मणि ॥ ४० ॥

म. अर्थ–वरील श्लोकांत सांगितलेल्या स्थितींत असतां जों-पर्यंत गृहस्थ स्नान करीत नाहीं तोंपर्यंत तो चांडाल समजावा. यास्तव ज्यामुळें शुभकृत्यांत उपयोग होतो तें स्नान करावें.

प्रातस्त्वं कुरु धर्मसारसलिले तीर्थे जिनेंद्रोदिते ॥
स्नानं ज्ञानमहोदधौ च समताभिक्षासरित्संगमे ॥
अन्तर्लीनमलस्य नाशजनकं बाह्यं च जीवक्षया–॥
द्गंगासागरपुष्करादिषु जनाः पापाय दुःखाय च॥४१॥

म. अर्थ–मित्रा! तूं धर्मरूप उत्तम पाणी असणाऱ्या, जिने-श्वरांनीं सांगितलेल्या ज्ञानरूप महासागराचे पवित्र तीर्थांत स्नान कर, तेथें समताभाव व भिक्षान्न ह्या दोन नद्यांचा संगम आहे, तेथें मनांतील पातकरूप मळाचा नाश होईल; लोक हो! गंगा, सागर, पुष्कर वगैरे बाह्य तीर्थांतील स्नानें हजारों जीवांचा नाश झाल्यामुळें पातकाला व दुःखाला कारण आहेत.

## ॥ शरीरसाफल्यवर्णनं ॥

ते नेत्रे सफले मन्ये पश्येते ये जिनं गुरुं ॥
शास्त्रमन्यच्च पश्येतां व्यर्थे पापप्रदे ध्रुवं ॥ ४२ ॥

म. अर्थ–जे नेत्र देव, गुरु, शास्त्र ह्यांचें दर्शन घेतात ते पा-हणाऱ्याचे नेत्र धन्य होत, ह्यापेक्षां अन्य वस्तूंकडे पाहतील तर ते खरोखर पातक उत्पन्न करणारे होत.

तौ कर्णौ सफलौ ज्ञेयौ पीयमानौ श्रुतामृतं ॥
पापशास्त्रादि शृण्वन्तौ निष्फलौ स्फुटितौ वरं ॥४३॥

म. अर्थ–जे कान नेहमीं शास्त्रामृताचें प्राशन करितात ते

सफल जाणावेत. भलतीं शास्त्रें वगैरे ऐकतील तर निर्फळ होत, त्यापेक्षां फुटून गेलेले बरे !

**तां जिव्हां सफलां मन्ये या ज्ञानामृतलालसा ॥**
**दक्षा धर्मोपदेशे च सच्छास्त्रात्पापहा भवेत् ॥ ४४ ॥**

म. अर्थ–जी जीभ ज्ञानामृत प्राशन करण्याची आवड करिते व धर्मोपदेश करण्याविषयीं दक्ष असते त्या जिभेस मी सफल मानितों. चांगल्या शास्त्रामुळें ती निर्दोष होईल.

**अभ्यर्थयामि हे जिव्हे वक्तव्यं मधुरं वचः ॥**
**हितं गुणाकरं सारं पापाढ्यं त्यज दुःखदं ॥ ४५ ॥**

म. अर्थ–आणखी दुसरें हें मागतों, हे जिव्हे, बोलणें झाल्यास पाप लागणारें व दुःख वाटेल असें भाषण बोलूं नकोस, हितकारक, गुण घ्यावयाजोगें, चांगलें व मधुर भाषण करावें.

**तौ हस्तौ सफलौ स्यातामर्चयन्तौ जिनं गुरुं ॥**
**कुदेवार्चनतो व्यर्थौ तथा हिंसाप्रवर्त्तकौ ॥ ४६ ॥**

म. अर्थ–जे जिनेश्वराची गुरूची पूजा करितात ते हात सफल समजावे, वाईट देवतांचें पूजन करणारे, हिंसा कृत्यास प्रवृत्त होणारे व्यर्थ आहेत असें समजावें.

**जिनेश्वरे गुरौ शास्त्रे नमते यस्य मस्तकं ॥**
**तस्यैव सफलं मन्ये अन्यत्र नमने वृथा ॥ ४७ ॥**

म. अर्थ–जिनेंद्रापुढें, गुरूपुढें शास्त्रापुढें ज्याचें मस्तक नम्र असतें त्याचेंच मस्तक धन्य होय. ह्यांहून दुसऱ्यांस नमन करणाऱ्याचें मस्तक व्यर्थ आहे.

**वीतरागे मुनौ शास्त्रे गच्छतश्चरणौ हि यौ ॥**
**यात्रादिके महातीर्थे सफलौ तौ न चापरौ ॥ ४८ ॥**

म. अर्थ—सर्वज्ञदेवाविषयीं, मुनीविषयीं, शास्त्राविषयीं यात्रा वगैरे कृत्यांत महातीर्थास जे चरण उपयोगीं पडतात ते धन्य होत. दुसरे नव्हत.

हृदयं तदहं मन्ये यद्विवेकश्रुतान्वितं ॥
तत्परं जिनधर्मे च परं पापप्रदं भवेत् ॥ ४९ ॥

म. अर्थ—जें मन जिनधर्माविषयीं दक्ष तसेंच विचार आणि शास्त्र ह्यांनीं युक्त असेल तेंच धन्य होय, दुसरें पापदायक होईल.

मन्ये देहं तदेवाहं यच्चारित्रतपःक्षमं ॥
परिषहसहं धीरमतः पापकरं परं ॥ ५० ॥

म. अर्थ—जें शरीर परीषह सहन करणारें असून धैर्य धरणारें आहे, चारित्र व तपश्चर्येस समर्थ आहे तेंच शरीर धन्य होय, दुसरें पापदायक होय.

दर्शनज्ञानवृत्तेन विना यो परमत्ति सः ॥
आहारं पशुरूपेण भारवाहो भविष्यति ॥ ५१ ॥

म. अर्थ—दर्शन, ज्ञान, चारित्र ह्यावांचून जो कोणी दुसरें भक्ष्य खातो तो जनावराचे रूपानें ओझें वाहणारा होईल.

नेत्रे यस्य जिनेंद्रवीक्षणपरे पादौ हि यातःपुनः ॥
यात्रायां च करौ समर्चनपरौ कर्णौ च शास्त्रान्वितौ ॥
जिव्हा सद्गुणभाषणे च कुशला ध्याने मनस्तत्परं ॥
मन्ये तस्य हि मर्त्यजन्म सफलं तेनैव भूर्भूषिता ॥ ५२ ॥

म. अर्थ—ज्याचे नेत्र जिनदर्शन घेण्याविषयीं उत्कंठित, यात्रा करण्याचे कामांत पाय नेहमीं तत्पर, पूजा वगैरे करण्याविषयीं हात सिद्ध, कानांस शास्त्रश्रवणाची आवड, सद्गुणाची प्रशंसा करण्याचे कामांत जीभ मोठी चतुर, ध्यानामध्यें चित्त निमग्न अशा मनुष्याचें जन्म यथार्थ होय, व त्यामुळेंच पृथ्वीस शोभा आहे असें वाटतें.

**अन्धएव वराकोसौ यो जिनं नैव पश्यति ॥**
**शृणोति न स सच्छास्त्रं बधिरः पापकारकः ॥ ५३ ॥**

म. अर्थ–जो जिनदर्शन घेत नाहीं तो नीच आंधळा व जो चांगलें जिनाचें शास्त्र ऐकत नाहीं तो पापी बहिरा होय.

**यौवने कुरु भो मित्र तपो दुःस्सहमंजसा ॥**
**जिनदीक्षां समादाय मुक्तिस्त्रीचित्तरंजकां ॥ ५४ ॥**

म. अर्थ–अरे मित्रा, मोक्षलक्ष्मीचें मन रमविणाऱ्या जिनदीक्षेस घेऊन तरुणपणांतच लवकर दुःसह तपश्चर्या कर.

**पूजा दानं तपो धर्मं ज्ञानं वृत्तं च शक्यते ॥**
**यौवने न च वृद्धत्वे सर्वमाचरितुं स्वयं ॥ ५५ ॥**

म. अर्थ–पूजा, दान, तप, धर्म, ज्ञान, वृत्त वगैरे आचार जातीनें आचरण्यास तरुणपणांत शक्ति असते, वृद्धपणांत शक्ति रहाणार नाहीं.

**अर्थं प्राप्य न शक्यते च बत यैः कर्तुं जिनेंद्रालयं ॥**
**दानं चापि समर्थदेहमपि ये लब्ध्वा तपो न क्षमा ॥**
**दारिद्र्योपहतास्त्यजंति न गृहं चाशां न मुंचंति ये ॥**
**अत्रामुत्र च दुःखदुर्गतिरहो निंदा च तेषां भवेत्॥५६॥**

म. अर्थ–जे लोक पैसा जवळ पुष्कळ असला तरी जिनमंदिर बांधीत नाहींत, आणि दान देत नाहींत, बळकट शरीर असलें तरी तपश्चर्या करीत नाहींत, ज्यांना दया असत नाहीं, दारिद्र्यानें पीडिले तरी घरादारांची आशा सोडीत नाहींत त्यांची ह्यालोकीं व परलोकीं दुर्दशा व निंदा होते.

**अज्ञानाद्यत्कृतं पापं सज्ञानात्तद्विमुच्यते ॥**
**भूत्वा ज्ञानं कृतं पापं वज्रलेपः प्रजायते ॥ ५७ ॥**

म. अर्थ–मूर्खपणानें केलेलें पाप त्याचें ज्ञान होऊन पश्चा-

त्याप झाल्यावर नाहींसें होतें, परंतु जाणून बुजून केलेलें पाप वज्रलेप होतें.

वरं गार्हस्थ्यमेवात्र न च वृत्तं कलंकितं ॥
रागद्वेषमदोन्मादैरत्रामुत्र च दुःखदं ॥ ५८ ॥

म. अर्थ—ह्याजगांत गृहस्थपणा ( गृहस्थाश्रम ) बरा, परंतु राग, द्वेष, अभिमान, उन्मत्तपणा ह्यांच्यामुळें इहपरलोकीं दुःख देणारें निंदास्पद यतित्व ( सन्यासपण ) नको.

गृहव्यापारजं पापं जिनपार्श्वे विमुच्यते ॥
जिनपार्श्वे कृतं पापं कथं मूढः परित्यजेत् ॥ ५९ ॥

म. अर्थ—गृहकृत्य वगैरे कामांत लागलेलें पाप जिनेश्वराचे चरणाजवळ नाहींसें होईल, परंतु जिनेश्वराजवळ केलेल्या पातकांतून मूर्ख कसा मुक्त होईल?

अंगुलीस्फोटनं हास्यमसत्यवचनं शुचं ॥
निष्ठीवनं च भुक्त्यादि तथा पादप्रसारणं ॥ ६० ॥
वार्त्तादिकरणं क्रोधं भक्षणं मर्मचालनं ॥
शयनं चाप्यवष्टंभं वर्जयेद्यतिसन्निधौ (युग्मं)॥६१॥

म. अर्थ—बोटें मोडणें, हासणें, खोटें बोलणें, दुःख तसें चावणें, जेवणें वगैरे, पाय पसरणें, गोष्टी सांगणें, रागावणें, मर्मभेदक बोलणें, निजणें, ताठ उभे राहणें, इतक्या गोष्टी यतीश्वराजवळ करूं नयेत.

## ॥ निर्माल्यत्यजनवर्णनं ॥

जिनस्याग्रे धृतं येन फलं स्वर्गगृहं व्रजेत् ॥
यो मूढस्तच्च गृण्हाति न विद्मस्तस्य का गतिः ॥६२॥

म. अर्थ—जिनेश्वरापुढें ज्यानें फळ ठेविलें तो स्वर्गास जातो, जो मूर्ख तें घेतो त्याचा काय परिणाम होईल आह्मांस सांगतां येत नाहीं.

**देवशास्त्रगुरूणां च निर्माल्यं स्वीकरोति यः ॥**
**वंशच्छेदं परिप्राप्य स पश्चाद्दुर्गतिं व्रजेत् ॥ ६३ ॥**

म. अर्थ– देव शास्त्र आणि गुरु ह्यांस अर्पण केलेल्या वस्तु कोणी मूर्ख आपल्या उपयोगास घेईल तो मूर्ख कुलक्षयास पात्र होऊन मागाहून नरकास जाईल.

**ढौकयेच्च फलं कश्चिद्भव्यो गृण्हाति यः कुधीः ॥**
**जिनाग्रे तद्धि किं तेन स्वं ज्ञातमजरामरं ॥ ६४ ॥**

म. अर्थ–जो कोणी भव्य जीव जिनेश्वरास ज्या वस्तु अर्पण करितो त्या कोणी घेतो तो घेणारा मनुष्य आपणास अजरामर समजतो काय ?

**रत्नत्रयं समुच्चार्य गुरुपादौ प्रपूजितौ ॥**
**पूजया तां च यो गृण्हन् प्राघूर्णो दुर्गतेः स ना ॥ ६५ ॥**

म. अर्थ–रत्नत्रयांचा उच्चार करून ज्यानें मुनीश्वराचे दोन्ही चरण पूजाद्रव्यानें पूजिले, तें द्रव्य जो ग्रहण करील तो नरकाचा पाहुणा समजावा.

**जिनेश्वरमुखोत्पन्नं शास्त्रं केनापि चर्चितं ॥**
**अर्चया तां हि यो गृण्हन् स मूकबधिरो भवेत् ॥६६॥**

म. अर्थ–जिनेश्वराचे मुखांतून निघालेलें शास्त्र कोणीं पूजा द्रव्यानें पूजिलें असेल तें पूजाद्रव्य जो घेईल तो मुका व बहिरा होईल.

**देवद्रव्येषु यत्तेजो गुरुद्रव्येषु यत्सुखं ॥**
**तत्सुखं कुलनाशाय मृतेपि नरकं व्रजेत् ॥ ६७॥**

म. अर्थ–देवद्रव्यांत जें तेज, गुरुद्रव्यांत जें सुख वाटत असेल तें सुख वंशाचा नाश करणारें होय, व तें देवद्रव्य घेणारा मरणानंतर नरकास जातो.

## ॥ व्रतभंगत्यजनवर्णनं ॥

वरं प्राणपरित्यागो न च भंगो व्रतादिके ॥
गुरुदेवादिलोपेन श्वभ्रतिर्यग्गतिर्भवेत् ॥ ६८ ॥

म. अर्थ–जीव देणें बरें, परंतु घेतललें व्रत मोडूं नये, गुरु देव वगैरेचा नियम मोडणें हें नरकाचें कारण आहे.

अमेध्यभक्षणं श्रेष्ठं न तु त्यक्तस्य भक्षणं ॥
वस्त्रादिकं न तु ग्राह्यं प्राणैः कंठगतैरपि ॥ ६९ ॥

म. अर्थ--अपवित्र पदार्थ खाल्लेले पुरवले परंतु जे पदार्थ न खाण्याचा नियम केला ते पदार्थ खावूं नयेत, कंठगतप्राण झाला तरी वस्त्र वगैरे घेऊं नये.

परित्यज्य च गृण्हाति वस्तु र्च्छादितलोलुपः ॥
इहलोके च हास्यं सोप्यमुत्र दुर्गतिं व्रजेत् ॥ ७० ॥

म. अर्थ–लोभी मनुष्य एकवेळ वस्तूचा त्याग करून तीच पुन्हां घेतो तो ह्यालोकीं निंदेस पात्र होऊन परलोकीं नरकास जातो.

देवसद्गुरुशास्त्राणि साक्षीकृत्य व्रतानि यः ॥
धृत्वा त्यजति तान्यस्य दुःखदानि भवे भवे ॥ ७१ ॥

म. अर्थ–देव, सद्गुरु, शास्त्र यांचेसमक्ष व्रतें घेऊन त्यांस जो सोडितो तीं त्याला जन्मोजन्मीं दुःखदायक होतात-

सुरगतिगृहमार्गं ज्ञानविज्ञानहेतुं ॥
जिनगणधरसेव्यं धर्मबीजं व्रतं त्वं ॥
कुरु, सुनियमभंगं धीरनिंद्यं कुसंगं ॥
त्यज, झटिति दुरंतं पापसन्तापकारी ॥ ७२ ॥

म. अर्थ–व्रतरक्षण हें स्वर्गरूप गृहाचा मार्ग आहे, ज्ञान व चातुर्याला कारण आहे, जिनेश्वर व गणधर यांनीं सेविलेलें आहे, तें व्रतरक्षण तूं कर, विद्वानांस मान्य नसणारा, वाईट

लोकांचा सहवास व व्रतभंग हूं करूं नकोस, त्यापासून तत्काळ वाईट परिणाम होतो, व्रतभंग पातकास व संतापास कारण आहे.

## ॥ समाधिमरणवर्णनं ॥

उपसर्गे च दुर्भिक्षे वृद्धत्वे रोगपीडिते ॥
व्रतमादाय सन्यासे त्यज प्राणान् विमुक्तये ॥७३॥

म. अर्थ—उपसर्गाच्या वेळीं, दुष्काळाच्या वेळीं, म्हातारपणीं व शरीरास रोग झाला असतां मोक्षप्राप्तीसाठीं सन्यास घेऊन प्राणत्याग कर.

धीरत्वे साति मृत्युश्च कातरत्वस्य किं फलं ? ॥
कातरत्वं परित्यज्य धीरत्वे मरणं कुरु ॥ ७४ ॥

म. अर्थ—धैर्य धरिलें तरी मरण यावयाचेंच मग भिण्याचा काय उपयोग ? झास्तव भय सोडून निर्भयपणानें मरणाची वाट पहा.

मृत्युस्तथा समाराध्य चाराधनचतुष्टयं ॥
कार्यो यथा पुनर्नस्याज्जन्ममृत्युकदंबकं ॥ ७५ ॥

म. अर्थ—चार प्रकारची आराधना करून मृत्यु अशारीतीनें येईल असें करावें कीं, पुन्हा जन्ममरणाचा समुदाय न येईल.

मृत्युकाले विषोढव्याः क्षुत्तृषादिपरीषहाः ॥
उपसर्गाश्च रोगाश्च सर्वे स्वर्मोक्षहेतवे ॥ ७६ ॥

म. अर्थ—मरणसमयीं स्वर्गप्राप्ति व मोक्षप्राप्ति होण्यासाठीं क्षुधा, तृषा वगैरे परीषह, लोकांनीं दिलेलीं दुःखें व रोग वगैरे सहन करावे.

अमलगुणनिधानं मोक्षवृक्षस्य बीजं ॥
कुगतिदृढकपाटं स्वर्गसंदानदक्षं ॥

मुनिजनगणसेव्यं धर्मरत्नस्य गेहं ॥
कुरु मरणमपि त्वं वृत्तसन्यासपूर्वं ॥ ७७ ॥

म. अर्थ—सन्यासरीतीनें मरण येणें हें निर्मल गुणांचा निधि आहे, मोक्षरूप वृक्षाचें बीज आहे, नरकाचा बळकट बंद केलेला दरवाजा आहे, स्वर्गप्राप्ति करून देण्यास समर्थ आहे, मुनीश्वरांच्या समुदायांनीं सेविलेलें आहे, धर्मरत्नाचें भांडार आहे, तें समाधिमरण तूं साध.

## ॥ आशात्यजनवर्णनं ॥

मन्ये स एव पुण्यात्मा यस्याशा निधनं गता ॥
इहामुत्र च निःसंगः इंद्रचक्रधरैः स्तुतः ॥ ७८ ॥

म. अर्थ—ज्याची आशा नाहींशी झाली ( जो निरिच्छ आहे ) मी त्यालाच पुण्यवान् समजतों, जो इहलोकीं व परलोकीं निःसंग असून इंद्र व सार्वभौमराजे ज्याला स्तवितात.

तपश्चारित्रधर्मादि सर्वं कृत्वा समीहते ॥
स्वर्गऋध्यादिकं यः स भस्मार्थे सद्धनं दहेत् ७९ ॥

म. अर्थ—तप, चारित्र, धर्म वगैरे सर्व करून जो मनुष्य स्वर्गाची व संपत्तीची इच्छा करितो तो मनुष्य राखेसाठीं चांगलें द्रव्य जाळितो.

आशां यः कुरुते मुक्तौ तस्याशा सफलं भवेत् ॥
वृथा परा मनुष्याणां पातकागमकारिणी ॥ ८० ॥

म. अर्थ—जो मनुष्य मोक्षाची आशा करितो त्याची आशा मात्र यथार्थ होय, दुसरी मनुष्यांची आशा पातकास कारण आहे.

वृद्धो यः कुरुते आशां नारीपुत्रसुखादिके ॥
न च वैराग्यमादत्ते दुर्गतिं याति सोधमः ॥ ८१ ॥

म. अर्थ—जो मनुष्य म्हातारा झाला तरी स्त्री, पुत्र, सुख वगै-

रेची आशा करितो, वैराग्य पावत नाहीं, तो नीच दुर्गतीस जातो.

आशां दुर्गतिदापनैकचतुरां स्वर्लोकमोक्षार्गलां ॥
पापद्वेषकुशोकरोगभयदां सन्मानविध्वंसकां ॥
लोके सज्जनभक्षणैककुशलां सद्धर्मनिर्नाशकां ॥
भ्रातस्त्वं त्यज सर्पिणीमिव चलां स्वर्मुक्तिसंप्राप्तये ८२

म. अर्थ—आशा ही नरकप्राप्ति करून देण्याचे कामीं चतुर आहे, स्वर्गाची व मोक्षाची आडकाठी आहे, पातक, वैर, दुःख, रोग, भीति देणारी आहे, सन्मानाचा नाश करणारी आहे, लोकांतील चांगल्या वस्तु आपल्या स्वाधीन व्हाव्या अशी इच्छा करणारी आहे, चांगल्या धर्माचा नाश करणारी आहे, हे बंधो, तूं स्वर्गमुक्तीच्या प्राप्तीसाठीं चलन वलन करणाऱ्या ( सजीव ) सर्पिणीप्रमाणें तिचा त्याग कर.

## ॥ कुटुंबत्यजनवर्णनं ॥

कुटुंबमहितं ज्ञेयं दानधर्मनिवारकं ॥
पापमूलं मनुष्याणां दुस्त्यजं त्यज शत्रुवत् ॥८३॥

म. अर्थ—दान धर्म न करूं देणारें कुटुंब हें मनुष्यांचें शत्रु आहे असें समजावें, त्यापासून पातक उत्पन्न होतें, त्या कुटुंबास शत्रूसारखें सोडून दे.

यथाम्रे फलिते नित्यं भुक्त्यर्थं च खगाः स्थिताः ॥
फलापाये पुनर्नष्टाः विद्धि त्वं स्वजनास्तथा ॥ ८४ ॥

म. अर्थ—फळें आलेल्या आंब्याचे झाडावर जसे पक्षी नेहमीं बसतात व फळें नाहींशीं झाल्यावर सर्वजण उडून जातात तशी नातलगांची स्थिति आहे असें तूं जाण.

अन्या माता पिताप्यन्यः परा भार्या च बांधवाः ॥
पुत्रोन्यो जायते लोके विद्धि तिर्यङ्नरेषु च ॥ ८५ ॥

म. अर्थ–भाई परकी, बाप परका, दुसरे स्त्री बांधव वगैरे परके, मुलगा परका, ह्या जगांत व पशु मनुष्यादि योनींत अशी रीति आहे.

हृदये यस्य कामाग्निर्जाज्वलीति कुतः स्थितिः ॥
तस्य सद्धर्मसज्ज्ञानवृत्तध्यानादिवस्तुतः ॥ ८६ ॥

म. अर्थ–ज्याचे मनांत विषयवासना हाच अग्नि जळत आहे त्यांस सद्धर्म, सज्ज्ञान, सद्वर्त्तन, ध्यान, धारणा वगैरेंपासून सुख कोठून लागणार आहे ?

दारा दुर्गतिदानमार्गकुशला मुक्तिगृहेष्वर्गला ॥
पुत्राः सद्धनभक्षणैकचतुराः पाशोपमाः प्राणिनां ॥
पुत्रीबांधवमित्रशत्रुपितरो निघ्नन्ति धर्माकरं ॥
भ्रातस्त्वं त्यज चैतदेव सकलं धर्मं गुरुं चाश्रय ॥८७॥

म. अर्थ–स्त्री ही नरकगतीचा मार्ग दाखविण्याचे कामांत चतुर आहे, मोक्षरूप गृहाची आडकाठी आहे, पुत्र हे आपले पैसे खाण्याचे कामांत प्रवीण आहेत, प्राण्यांस फांशासारखे आहेत, मुलगी, नातलग, स्नेही, वैरी, आईबाप हे धर्मरूप रत्नांच्या खाणीस अंतरवितात. ह्यास्तव हे बंधो, तूं हें सर्व कुटुंब सोडून दे, आणि धर्माचा व गुरूचा आश्रय कर.

## ॥ कर्महननवर्णनं ॥

नैव गच्छति नायाति स्वयं जीवो हि पंगुवत् ॥
कर्मारिभिश्च नीयेत चतुर्गतिषु लोलुपः ॥ ८८ ॥

म. अर्थ–पांगळ्यासारखा जीव स्वतः कोठें जात नाहीं व येत नाहीं, आणि कर्मरूप शत्रूंनीं ओढून नेला तर चारी गतींत लुब्ध होऊन फिरतो.

**यत्किंचित्कुरुते जीवः क्रोधलोभभयादिकान् ॥**
**नाट्यमानो नटन् दारुपुमान् कर्मनटैर्यथा ॥ ८९ ॥**

म. अर्थ–जसी लांकडाची बाहुली दोरींत ओंवून नाचवावी तसी नाचते त्याप्रमाणें कर्मरूप नटांनीं नाचविलेला जीव नाचतो, व क्रोध, लोभ, भय वगैरे कांहीं करितो.

**यत्रैव देशकालादि दिने कर्मोदयाद्भवेत् ॥**
**तत्र स्यात्किं वृथा शोको हानिवृद्धिशुभाशुभे ॥९०॥**

म. अर्थ–कर्माचा उदय ज्याठिकाणीं ज्यावेळीं व्हावयाचा असेल तेथें होतोच, मग नुकसान, लाभ, मंगल अमंगल ह्याविषयीं व्यर्थ शोक कां करावा?

**पापेन दुःखदारिद्र्यदुर्गतीनां च संभवः ॥**
**भवेत्पुण्यवशात्स्वर्गः यदिष्टं तत्समाचर ॥ ९१ ॥**

म. अर्थ–पातकामुळें कष्ट, दरिद्र, नरक वगैरेंची प्राप्ति होते, व पुण्यामुळें स्वर्गप्राप्ति होते, ह्यास्तव तुला जसें आवडेल तसें कर.

**कर्म त्वं हन दुःखशोकभयदं संतापदोषाकरं ॥**
**रोगक्लेशपराभवस्य जनकं मुक्तिश्रियस्तस्करं ॥**
**संसारार्णवमज्जकं सुविषमं सौख्याम्बुनिर्नाशकं ॥**
**भ्रातस्तत्सुतपोसिना द्रुततरं स्वर्भोगमुक्त्याप्तये ॥९२॥**

म. अर्थ–कर्म हें दुःख शोक व भीति देणारें आहे, संताप व दोष यांची खाण आहे, रोग, क्लेश व पराभव करणारें आहे, मोक्षरूप संपत्ति चोरून नेणारें आहे, संसारसमुद्रांत बुडविणारें आहे, अतिशय भयंकर आहे, सौख्यरूप जलाचा नाश करणारें आहे, ह्यास्तव हे बंधो, चांगली तपश्चर्यारूप खड्गानें स्वर्ग व मोक्षप्राप्ति व्हावयासाठीं लवकर तोडून टाक.

## ॥ चतस्रोभावनाकरणवर्णनं ॥

कर्मायस्से जने शत्रौ रागद्वेषमदान्विते ॥
मानक्रोधादिकं त्यक्त्वा माध्यस्थ्यं भज मुक्तये९३

म. अर्थ–रागद्वेषानें युक्त असणाऱ्या शत्रूप्रमाणें कर्म जीवास त्रास देतें, ह्यास्तव क्रोध मान वगैरे सोडून मोक्षप्राप्तीसाठीं समताभाव धर. ( बरोबर समजलें नाहीं. )

ज्ञानचारित्रसद्धर्मे गुरुश्रावककारणे ॥
जिनगेहादिसत्कार्ये पक्षपातं सदा कुरु ॥ ९४ ॥

म. अर्थ–ज्ञान, चारित्र व सद्धर्म ह्याविषयीं, मुनि आणि श्रावक ह्यांविषयीं, व जिनेश्वराच्या मंदिराविषयीं तूं नेहमीं तत्पर रहा. ( ही कृत्यें करीत जा. )

ज्ञाने तपसि धर्मे च जिनशास्त्रे गुरौ सदा ॥
सेवा हिताय कर्त्तव्या स्वस्य सर्वसुखप्रदं ॥ ९५ ॥

म. अर्थ–ज्ञानाविषयीं, तपाविषयीं, धर्माविषयीं, जिनशास्त्राविषयीं, गुरुविषयीं, नेहमीं आदर करावा; त्यापासून आपलें व दुसऱ्यांचें देखील कल्याण आहे.

दुर्लक्ष्यं न च कर्त्तव्यं तपोधर्मादिके कदा ॥
सज्ज्ञानपठने दाने पूजने गुरुसेवने ॥ ९६ ॥

म. अर्थ–तपश्चर्या धर्म वगैरे कृत्यांत कधीं ही आळस करूं नये, तसेंच शास्त्र वाचण्यांत, दान देण्यांत, पूजन करण्यांत गुरूची सेवा करण्यांत कधींही चुकूं नये.

सत्वे त्वं कुरु मित्रभावमतुलं सिद्धान्ततत्वान्विते ॥
जीवे सद्गुणधर्मरत्नसदने रागं परं मुक्तिदं ॥
क्लिष्टे दुःखवियोगरोगसहिते सारां कृपां सिद्धिदां ॥
रागद्वेषमदान्वितेतिविषमे माध्यस्थ्यभावं च भो:९७

म. अर्थ–सिद्धांतशास्त्रांत प्रवीण असणाऱ्या जीवाशीं फार मित्रत्व कर, सद्गुण व धर्मरूप रत्नांचें घर अशा प्राण्याशीं मोक्षप्राप्तीस कारण असें प्रेम कर, पीडित, दुःखित, वियोगी, रोगी अशा प्राण्यावर दया कर, क्रोध, द्वेष, गर्व ह्यामुळें भयंकर वाटणाऱ्या प्राण्याशीं समताभाव धर. ( मैत्री, प्रमोद, कारुण्य, माध्यस्थ ह्या चार भावना होत. )

## ॥ महामंत्रजपवर्णनं ॥

दुःखे सुखे चाब्धिभये कुदेशे ॥
व्याधौ गृहे चार्णवपर्वतेषु ॥
सुसे विषादे विषमे रणे च ॥
पदे पदे त्वं जप मंत्रराजं ॥ १८ ॥

म. अर्थ–दुःखांत, सुखांत, समुद्रांत, वादळाच्यावेळीं, वाईट देशांत, व्याधि झाली असतां, ग्रहपीडा झाली असतां, समुद्रांत किंवा पर्वतावर निजल्यावेळीं, दुःखाचे वेळीं, बिकट प्रसंगीं, युद्धसमयीं तूं क्षणोक्षणीं मंत्रश्रेष्ठाचें स्मरण कर.

यथाणुभिः परं नाल्पं न महद्गगनात्परं ॥
तथा पंचनमस्कारमंत्रान्मंत्रो न विद्यते ॥ ९९ ॥

म. अर्थ–जसी अणुरेणूपेक्षां लहान वस्तु दुसरी नाहीं, आकाशापेक्षां मोठी वस्तु दुसरी नाहीं, तसेंच पंच नमस्कार मंत्राहून दुसरा चांगला मंत्र नाहीं.

यः सप्तव्यसनासक्तो मंत्रराजं जपेन्नरः ॥
मरणे सोपि स्वर्गश्रीनाथो भवति नान्यथा ॥ ३०० ॥

म. अर्थ–जो कोणी मनुष्य सातही दुर्गुणांनीं युक्त असेल तो जरी हा मंत्रराज जपेल तर तो हा मरणानंतर स्वर्गलक्ष्मीचा पति होतो. ( स्वर्गास जातो. ) हें खोटें नाहीं.

जपंति ये न मंत्रेशं दुःखदारिद्र्यनाशनं ॥
न च मुक्तिसुखं तेषां तन्मुखं रंध्रवद्वृथा ॥ १ ॥

म. अर्थ—दुःखाचा व दारिद्र्याचा नाश करणाऱ्या मंत्रश्रेष्ठास जे जपत नाहींत त्यांस मोक्षसुख नसून त्यांचें तोंड छिद्रासारखें व्यर्थ आहे.

यत्संग्रामकरीन्द्रवन्हिविषमैः सर्पादिरोगव्रजैः ॥
यत्सिंहव्रजतस्करैर्नृपवरव्याघ्रैः सरित्सागरैः ॥
भूतप्रेतपिशाचराक्षसमहादुर्बंधराजादिकैः ॥
यद्दत्तं भयमत्र मंत्रजपनान्नश्यत्यहो तं जप ॥ २ ॥

म. अर्थ—जें भय युद्धभूमि, मोठमोठे हत्ती, अग्नि व भयंकर प्रसंग यांनीं दिलें, जें भय सर्प वगैरे व रोगांच्या समुदायांनीं दिलें, जें भय सिंहांचे समुदाय, चोरांच्या टोळ्या, राजेरजवाडे, वाघ, नद्या, समुद्र ह्यांनीं दिलें, जें भय भूत, प्रेत, पिशाच, राक्षस मोठमोठे दुर्व्यसनी राजे ह्यांनीं दिलें, तें भय ज्याचे स्मरणानें नाश पावतें त्या मंत्रश्रेष्ठास नेहमीं स्मरण कर.

## ॥ धर्मौषधकरणवर्णनं ॥

औषधं परमं ज्ञेयं धर्मो वृत्तं तपो जपः ॥
दानं पूजादिकं सर्वरोगक्लेशविनाशकं ॥ ३ ॥

म. अर्थ—धर्म, चारित्र, तप, जप, दान, पूजा वगैरे मोठें औषध आहे असें समजावें, ह्यापासून सर्व प्रकारचे रोग व दुःखें नाहींशीं होतात.

नश्यन्ति येन धर्मेण जन्ममृत्युजरादिकाः ॥
किं न नश्यंति? तेनैव रोगक्लेशभयादिकाः ॥ ४ ॥

म. अर्थ—ज्या धर्मापुळें जन्म, मृत्यु, वार्धक्य वगैरे नाश पावतात त्याच धर्मानें रोग, क्लेश, भय वगैरे नाश पावणार नाहींत काय?

**रोगक्लेशनिवृत्यर्थं मिथ्यात्वं यस्तु सेवते ॥**
**रोगक्लेशकरं मूढस्तैलेनाग्निं निवारयेत् ॥ ५ ॥**

म. अर्थ-रोगाचा त्रास चुकविण्यासाठीं, रोगाचा त्रास दे-णारें मिथ्यात्व जो मूर्ख सेवन करितो, तो तेलानें अग्नि विझवितो.

**शरीरं दह्यते रोगैर्न चात्मा सत्सुखाकरः ॥**
**अग्निना दह्यते गेहं नैवाकाशस्तदाश्रितः ॥ ६ ॥**

म. अर्थ-रोगामुळें शरीर जळतें, चांगल्या सुखाचा ठेवा असा आत्मा जळत नाहीं, आग लागून घर जळतें, परंतु घराची पोकळी जळत नाहीं.

**अन्नप्रदोषोद्भवं रोगं दिशंत्यौषधं ॥**
**वैद्या, ग्रहात्परिभवं विष्णवादिसंतर्पणं ॥**
**विप्राश्च, भूतादिजं पाखंडिनो, मंडलं ॥**
**मुनयः पापाच्युतं सध्दर्मपूजादिकं ॥ ७ ॥**

म. अर्थ-रोगाचा उपाय विचारल्यास वैद्य लोक अन्नविका-राचें कारण सांगून औषध सांगतात, ज्योतिषांस विचारतां ते ग्रहपीडेचें कारण सांगून ग्रहशांतीचे प्रकार सांगतात, ब्रा-म्हण विष्णु वगैरे देवतांची पूजा करावी ह्मणतात, नास्तिक लोक भूतबाधा झाली ह्मणतात, मुनीश्वर हा रोग पातकापा-सून उत्पन्न झाला असें ह्मणून पातक नाश करणारें धर्म पूजा वगैरे सत्कृत्य सांगतात. ( मूळ संस्कृतश्लोकाचें वृत्त व शुद्धाशु-द्धत्व समजत नसल्यानें अर्थ अजमासावरून लिहिला आहे. )

## ॥ धर्मशरणवर्णनं ॥

**व्याधिदुःखभराक्रान्ता नीयन्ते यममंदिरं ॥**
**प्राणिनः को भवेत्त्राता? धर्मं देवं गुरुं विना ॥ ८ ॥**

म. अर्थ—रोगाचे दुःखानें गांजलेले प्राणी यमाचे घरीं नेण्यांत येतात ( मरतात ) त्यावेळीं त्या प्राण्यांस धर्म, देव, गुरु ह्यांवांचून कोण दुसरा रक्षण करणारा आहे?

धर्मं ज्ञानं च चारित्रं तपो दानं जपादिकं ॥
शरण्यं मुनिभिः प्रोक्तं दुःखशोकांतकं नृणां ॥ ९ ॥

म. अर्थ—धर्म, ज्ञान, चारित्र, तप, दान, जप वगैरे जीवांचें रक्षक आहे असें मुनींनीं ह्मटलें आहे, हें दुःखाचा व रोगाचा नाश करितें.

स्वयं घर्षति हस्तौ च प्राणी भाले निहंति च ॥
वाक्येनाप्यसमर्थोहं हा हा धर्मं विना मृतः ॥ १० ॥

म. अर्थ—प्राणी जातीनें आपलें हात घांसतो व कपाळावर मारून घेतो, मी तोंडानें सांगण्यास देखील असमर्थ आहे कीं अरेरे मी धर्मावांचून मेलों. ( असें म्हणतो. )

यथाऽपातभयेनैव धनं निस्सार्यते गृहात् ॥
यमधाटीभयेनैव तथा धर्मं चरेद्बुधः ॥ ११ ॥

म. अर्थ—पडकें घर झालें असतां पडण्याचें भयानें जसें घरांतील द्रव्य बाहेर काढावें तसेंच यमाचे तावडींत सांपडण्याचे भयानें बुद्धिमान मनुष्य धर्मसंग्रह करितो.

यथाग्निज्वलिताद्गेहाद्धनं निष्काश्यते बुधैः ॥
तथा जराग्निना तप्ते देहे वृद्धश्चरेत्तपः ॥ १२ ॥

म. अर्थ—विस्तवानें चोंहोकडून पेटलेल्या घरांतून जसें विद्वानांनीं द्रव्य काढावें तसें वृद्धावस्थारूप विस्तवानें शरीर तापलें असतां वृद्ध मनुष्य तपश्चर्या करितो.

बालत्वेपि न यः कुर्याद्धर्मं स्वर्गगतिप्रदं ॥
पश्चात्कर्तुं न शक्नोति सोनवस्थवृषादिवत् ॥ १३ ॥

म. अर्थ–जो मनुष्य लहानपणापासूनच स्वर्गसुख मिळवून देणारा धर्मसंग्रह करीत नाहीं, तो म्हाताऱ्या बैलाप्रमाणें वृद्धपणांत देखील धर्मकृत्य करण्यास समर्थ होत नाहीं.

**यावदायुर्न नश्येत तावद्धर्मं सदा कुरु ॥**
**प्रदीप्ते भवने पश्चात्त कूपखननं यथा ॥ १४ ॥**

म. अर्थ–जोंपर्यंत आयुष्य नाश पावलें नाहीं तोंपर्यंत नेहमीं धर्म कर. जसें घर पेटल्यावर मागाहून आड खांदणें योग्य नाहीं.

**धर्मं दानं च कुर्वंति बालत्वेपि विचक्षणाः ॥**
**वृद्धत्वं वा समायाति नो वा न ज्ञायते क्वचित् ॥१५॥**

म. अर्थ–लहानपणापासूनच ज्ञाते लोक दान धर्म करितात, म्हातारपण येनें किंवा नाहीं कधींही समजत नाहीं.

**खचरनरसमग्रैर्देवराजासुरेन्द्रैः ॥**
**सकलसुखविशेषैर्मंत्रतंत्रादिशास्त्रैः ॥**
**यमनृपचरभृत्यैर्नीयमानोयमंगी ॥**
**शरणमपि वृषं स्याद्रक्ष्यते नैव चान्यैः ॥ १६ ॥**

म. अर्थ— ज्यावेळीं यमाचे दूत प्राण्यास नेतात त्यावेळीं त्याचा रक्षक जर धर्म नसेल तर त्याचें रक्षण करण्यास विद्याधर, मनुष्य, इंद्र, दैत्याधिपति, सर्व प्रकारचे सुखोपभोग, मंत्र, तंत्र, शास्त्र ह्यांपैकीं कोणी समर्थ नाहीं.

## ॥ एकत्वचिंतनवर्णनं ॥

**जातश्चैको मृतश्चैको एको धर्मं करोति च ॥**
**पुण्येन जीवः स्वर्गं च श्वभ्रं पापेन गच्छति ॥ १७ ॥**

म. अर्थ–जीव एकटा जन्मला, एकटा मरण पावला एकटा

धर्म करितो, पुण्यानें जीव स्वर्गास जातो, पापानें नरकास जातो.

मूढाः कुर्वन्ति ये मे मे वपुःसुतगृहादिकं ॥
तेपि त्यक्त्वा च रोगार्ता मज्जंति भवसागरे ॥ १८ ॥

म. अर्थ--जे मूर्ख, शरीर माझें, पुत्र माझा, घर वगैरे माझें म्हणतात; ते शेवटीं त्यास सोडून रोगानें गांजून संसारसमुद्रांत बुडतात.

अन्यो जीवो भवेद्यत्र दारापत्यगृहादिकं ॥
कथमेकत्वमापन्नमन्यो ब्रूते न तत्ववित् ॥ १९ ॥

म. अर्थ-ज्या ठिकाणीं जीव परका झाला त्या ठिकाणीं बायको, मूल, घर वगैरे एकत्र राहणारें कसें होईल? अशी असंबद्ध गोष्ट मूर्ख सांगेल, शहाणा सांगणार नाहीं.

कुटुंबधनधान्यादि सर्वं कर्मसमुद्भवं ॥
देहं च मन्यते स्वत्वं कर्म बध्नाति सः कुधीः ॥ २० ॥

म. अर्थ-कुटुंब, धन धान्य वगैरे सर्व कर्मापासून उत्पन्न झालेलें आहे, देहावर जो आपली मालकी आहे असें मानितो तो दुर्बुद्धि कर्मांचा संग्रह करितो.

एको धर्ममुपार्जनं च विबुधः कृत्वा स्वयं गच्छति ॥
स्वर्गं, पापमुपार्ज्य घोरनरकं दुःखाकरं प्राणभृत् ॥
एको दुष्करवृत्तसारमयि भो धृत्वा च मुक्त्यालयं ॥
तस्मात्त्वं भज चैकमेव शरणं धर्मं त्यजस्वाऽलयं॥२१॥

म. अर्थ-एक ज्ञाता, धर्माचें संपादन करून जातीनें स्वर्गास जातो, एक जीव पापसंग्रह करून भयंकर नरकास जातो, एकजण अलौकिक चारित्र पाळून मोक्षास जातो, म्हणून तूं एक धर्मसंग्रह कर, आपलें घर सोड.

## ॥ अनित्यभावनावर्णनं ॥

वदन्तीव जनाग्रेषु घटी घातेन प्रत्यहं ॥
धर्मस्य सेवनं पथ्यं वेलयं नागमिष्यति ॥ २२ ॥

म. अर्थ—घंटा आवाजाचे रूपानें नेहमीं लोकांपुढें धर्मसेवन हितकर आहे, गेलेली वेळ पुन्हा येत नाहीं असें सांगतेच कीं काय ?

नित्यं संक्षीयते चायुर्हस्ते न्यस्ताम्बुवत्क्षणं ॥
कथं न क्रियते धर्मो बुधैः संविग्नमानसैः ॥ २३ ॥

म. अर्थ—हातांत घेतलेल्या पाण्याप्रमाणें नेहमीं आयुष्य क्षीण होतें, यास्तव वैराग्य झालेल्या ज्ञात्यांनीं धर्म कां करूं नये ?

दिनं प्रति त्वया वत्स चिंतनीयं मया कृतं ॥
धर्मं दानं न वा नष्टमायुःखंडं हि दुर्लभं ॥ २४ ॥

म. अर्थ—हे मुला, तूं नेहमीं मनांत आण कीं " मी दानधर्म केला किंवा नाहीं. " गेलेल्या आयुष्याचा भाग पुन्हा मिळणें कठीण आहे.

दानपूजातपश्चैव ध्यानं ध्येयादिकं व्रतं ॥
अहिंसाव्रतकारुण्यं स्वर्मोक्षं ददते ध्रुवं ॥ २५ ॥

म. अर्थ—दान, पूजा, तपश्चर्या, ध्यान, धारणा, व्रत, अहिंसा, दया वगैरे गुण खरोखर स्वर्गप्राप्ति व मोक्षप्राप्ति करून देतात.

धर्मं विना न नेतव्या चैका कालकला बुधैः ॥
यमदूतः समायाति नेतुं न ज्ञायते क्वचित् ॥ २६ ॥

म. अर्थ—धर्माखेरीज विद्वान् लोकांनीं एक पळभर देखील वेळ व्यर्थ घालवूं नये; आपणास नेण्यास यमदूत केव्हां कोठें येईल सांगवत नाहीं.

प्रातः श्रीजिनवंदनादिकमपि कृत्वा गुरून्मानय ॥
त्वं शास्त्रं श्रुणु धर्मतत्वकथकं माध्यान्हकाले कुरु ॥
सद्देवार्चनपात्रदानमपरे कालेच धर्मासये ॥
श्रीदेवस्तवनं च सौख्यजनकं मुक्त्यंगनाहेतवे ॥२७॥

म. अर्थ–सकाळीं जिनेश्वराची वंदना वगैरे करून गुरूस मान दे. धर्मरहस्य स्पष्ट करणारीं शास्त्रें ऐक. दुपारीं देवपूजा व पात्रदान कर. बाकीचे वेळांत जिनस्तवन कर, त्यानें सुख लागेल व मोक्षप्राप्ति होईल.

## ॥ विवेकसेवनवर्णनं ॥

लक्ष्मीर्बुद्धिकृतज्ञता च सुगुणः वृत्तं च दानं तपो ॥
वैराग्यं च जितेंद्रियत्वमथवा शास्त्रस्य संचिंतनं ॥
देवार्चा च दयार्द्रता च विफला ध्यानं विवेकं विना ॥
सारासारसमग्रचिंतनमहो सर्वं वृथा प्राणिनां ॥२८॥

म. अर्थ–संपत्ति, बुद्धि, केलेले उपकार जाणण्याचा गुण, सद्गुण, चारित्र, दान, तप, वैराग्य, इंद्रियनिग्रहपणा, शास्त्राचा विचार, देवपूजा, दयाळुपणा, सारासारविचार करण्याची शक्ति हे सर्व प्राण्यांचे गुण विचारावांचून व्यर्थ आहेत.

देवादेवे विचारो यः पात्रापात्रे शुभाशुभे ॥
गुणागुणे च शास्त्रादौ विवेकः सोऽभिधीयते ॥ २९ ॥

म. अर्थ–देव, कुदेव, पात्र, कुपात्र, शुभ, अशुभ, गुण, अवगुण, शास्त्र, कुशास्त्र ह्यांचा विचार योग्य रीतीनें करणें ह्यास विवेक ह्मणतात.

अंजलिद्वयधान्यं हि नरो भुंक्ते तथा नृपः ॥
निर्धनो चेति नन्वाहो कुतृष्णां त्यज पापदां॥३०॥

म. अर्थ–दोन ओंजळी धान्य सामान्य मनुष्य खातो, तसा

राजा खातो, तसाच द्रव्यहीन मनुष्य देखील खातो ह्यास्तव पाप वृद्धिंगत करणारी अतिशय आशा सोडून दे.

वरं भिक्षाटनेनैतदुदरस्येह पूरणं ॥
न च शाल्योदनैः कृत्वा पापं दुर्गतिदुःखदं ॥३१॥

म. अर्थ—भिक्षा मागून येथें पोट भरलेलें बरें, परंतु साळीच्या तांदुळांनीं पोट भरून पाप वाढविणें नको.

तावद्धत्ते परं मानं प्रतिष्ठां पूज्यतां पुमान् ॥
ब्रूते यावन्न लोकाग्रे देहीति वचनं लघु ॥ ३२ ॥

म. अर्थ—जोंपर्यंत मनुष्य लोकांपुढें लहान तोंड करून "दे" असें म्हणत नाहीं तोंपर्यंत त्याचा मानपानतुक व प्रतिष्ठा असते.

गुरुत्वं मेरुवत्प्राप्तस्तपश्चारित्रसद्गुणैः ॥
यो मुनिर्याचया सोपि लघुः स्यादर्कतूलवत्॥३३॥

म. अर्थ—जो मुनीश्वर तपश्चर्या, चारित्र, सद्गुण इत्यादिकांमुळें मेरुपर्वतासारखें महत्व पावला तोच याचना करील तर, रुईचे कापसाप्रमाणें हलकेपणा पावेल.

यो रागद्वेषनिर्मुक्तः सर्वज्ञस्तेन भाषितं ॥
धर्मं श्रुतं प्रमाणं स्यान्नान्यैर्धूर्तैश्च कीर्तितं ॥ ३४ ॥

म. अर्थ—जो रागद्वेष सोडलेला सर्वज्ञ देव त्यानें सांगितलेल्या धर्मावर व शास्त्रावर विश्वास ठेवावा, दुसऱ्या ठकांनीं सांगितलेल्या धर्मावर विश्वास ठेवूं नये.

सर्वज्ञोक्तस्य शास्त्रस्य निःसंदेहस्य शंकते ॥
यः पापी सोथवाभव्यो लुप्तबोधसुलोचनः ॥ ३५ ॥

म. अर्थ—सर्वज्ञ वीतरागानें सांगितलेले शास्त्रांत शंका घेण्यास कारण नसतां जो मनुष्य त्यांत संशय घेतो तो पातकी किंवा ज्ञानरूप नेत्र आंधळें झालेला अभव्य समजावा.

**हेमवच्च सदा धर्मो ग्राह्यः कृत्वा परीक्षणं ॥**
**दक्षैर्बहुप्रकारो हि लोकशास्त्रेषु कीर्तितः ॥ ३६ ॥**

म. अर्थ–विद्वान् मनुष्यांनीं धर्म नेहमीं सोन्यासारखा परीक्षा करून घ्यावा. कांतर अन्यमती लोकांच्या शास्त्रांत तो त्या लोकांनीं अनेकरीतींनीं वर्णिलेला आहे.

**विषयविरतिमूलं सत्तपःस्कंधबंधं ॥**
**सकलविनयशाखं ज्ञानविज्ञानपत्रं ॥**
**विमलसमितिपुष्पं मुक्तिनारीफलाढ्यं ॥**
**भज विगतकलंकं कल्पवृक्षं विवेकं ॥ ३७ ॥**

म. अर्थ–विचार हा कल्पवृक्ष आहे, विषयसंगाची विरक्तता ही त्याचें मूल आहे, चांगली तपश्चर्या ही त्याची मोठी फांदी होय, सर्वप्रकारच्या नम्रता त्याच्या लहान फांद्या होत, ज्ञान व कुशलता हीं पानें होत, निष्पाप समिति त्याचें फूल होय, मुक्तिस्त्री हें फळ होय, त्या निर्दोष विचाररूप कल्पवृक्षाचा तूं आश्रय कर.

## धर्मसंबलकरणवर्णनं ॥

**गव्यूतिं प्रव्रजन् मार्गे यः पाथेयं करोति सः ॥**
**न प्राप्नोति कदा दुःखं तथा धर्माश्रयान्नरः ॥ ३८ ॥**

म. अर्थ–जो दोन कोस जाणें झालें तरी बरोबर फराळाचें पदार्थ घेतो तो कधींही दुःख पावत नाहीं, तसेंच धर्माश्रयामुळें मनुष्यास दुःख होत नाहीं.

**संबलं नाचरेन्मूढः धर्मं दानं तपो व्रतं ॥**
**इहामुत्र हितार्थाय न जाने तस्य किं भवेत् ॥३९॥**

म. अर्थ–जो मूर्ख, दान तप, व्रत ह्याचा आश्रय ह्यालोकीं व परलोकीं सुख होण्यासाठीं करीत नाहीं त्याचें काय होईल समजत नाहीं.

धर्मसंवलतः स्वर्गं श्वभ्रं पापफलाद्भवेत् ॥
सुखं दुःखं विदित्वा त्वं यदिष्टं तत्समाचर ॥ ४० ॥

म. अर्थ–धर्मसंग्रह केला तर स्वर्ग मिळतो, पापसंग्रह केला तर नरकप्राप्ति होते, तेथील सुख दुःख जाणून जें आवडेल तें कर.

गृहव्यापारसंसक्तो यो धर्मं न करोति सः ॥
पापसंबलमादाय श्वभ्रतिर्यग्गतिं व्रजेत् ॥ ४१ ॥

म. अर्थ–जो मनुष्य नेहमीं घरगुती कामधंद्यांत गुंतून धर्म करीत नाहीं, तो पातकसंग्रह करून नरकगतीस व पशुगतीस जाईल.

धर्मस्याश्रयतो नृदेवखचरव्यालेंद्रसौख्यं भवे–॥
दत्रामुत्र च चंद्रनिर्मलयशःपूजादिकं प्रत्यहं ॥
पापेनैव सुघोरदुर्गतिगृहे क्लेशावहां यातनां ॥
निंदां कीर्तिकरं तदेव कुरु भो भ्रातर्यदिष्टं तव ।४२।

म. अर्थ–धर्म केल्यापासून भूपति, विद्याधर, धरणेंद्र यांचें सुख मिळून ह्यालोकीं व परलोकीं चंद्रासारखें निर्मल यश वाढेल, व दररोज मानमान्यता होईल. पातकापासून भयंकर नरकगृहांत अत्यंत कष्ट देणारी, निंदा व दुर्यश वाढविणारी यातना भोगावी लागेल, यास्तव हे मित्रा, तुला जें योग्य दिसेल तेंच कीर्ति वाढविणारें कृत्य तूं कर.

## ॥ मानुष्यदुर्लभत्ववर्णनं ॥

संसारेऽत्र दुरंतदुःखभयदे सारं नृजन्म क्वचि–॥
ल्लब्धं कल्पतरूपमं हि यदि चेत्संप्राप्य देशं कुलं ॥
आरोग्यं सकलेंद्रियं च सुगुरुं ज्ञानं विवेकं तदा ॥
संसाराम्बुधितारके सुखकरे धर्मे यतध्वं बुधाः।४३।

म. अर्थ–अनंत दुःख देणाऱ्या ह्या संसारांत उत्तम नरजन्म मिळाला असेल तर कल्पवृक्षासारखा चुकून मिळाला असेल, चां-

गला देश, चांगला वंश, निरोगी शरीर, सर्व इंद्रियें, सद्गुरु, विचार व ज्ञान मिळालें असेल तर संसारसमुद्रांतून तारणाऱ्या सुख देणाऱ्या धर्माविषयीं विद्वानांनो तुम्ही यत्न करा.

**मानुष्यं दुर्लभं प्राप्य यः प्रमादं तनोति वै ॥**
**धर्मे सुखाकरे सोपि ऋणग्राहीव सीदति ॥ ४४ ॥**

म. अर्थ–दुर्मिळ असा मनुष्यजन्म मिळाला तरी जो सुखदायक अशा धर्माविषयीं आळस करितो तो कर्जग्रस्ताप्रमाणें दुःख पावतो.

**अंबुधौ नष्टरत्नं वा दैवादायाति जातुचित् ॥**
**मानुष्यं न च धर्मेण विना जन्मशतैरपि ॥ ४५ ॥**

म. अर्थ–समुद्रांत हरवलेलें रत्न दैवयोगानें कदाचित् सांपडेल, परंतु धर्मावांचून शेंकडों जन्म घेतलें तरी मनुष्यजन्म मिळणार नाहीं. ( मनुष्यजन्म दुर्मिळ आहे. )

**संसारे यदि चेन्मूढ लब्धं दैवाद्धि मानुषं ॥**
**कश्चित्धर्मस्त्वया कार्यः सफलं येन तद्भवेत् ॥ ४६ ॥**

म. अर्थ–हे अज्ञान मनुष्या, जर संसारामध्यें दैवयोगानें मनुष्यजन्म मिळाला तर कांहीं तरी त्वां धर्म करावा. ज्यामुळें त्या नृजन्माचें सार्थक होईल.

**सद्धर्मं यः परित्यज्य भुंक्ते संसारजं सुखं ॥**
**विमूढात्मा सुधेत्युक्त्वा स गृण्हाति महाविषं ४७।**

म. अर्थ–जो चांगल्या धर्मास सोडून संसारसुख सेवन करितो, तो मंदबुद्धि अमृत म्हणून विष घेतो.

**नियमेन विना पुंसां पुण्यं भवति नो ध्रुवं ॥**
**वृथा वस्तुपरित्यागो न वृद्धिः सद्व्रतं विना ॥ ४८ ॥**

म. अर्थ—नियमावांचून मनुष्यांस पुण्य खरोखर लागत नाहीं परिग्रहत्याग व्यर्थ असून त्यास महत्वही नाहीं.

**नियमेन विना प्राणी पशुरेव न संशयः ॥**
**खाद्याखाद्यं न जानाति भेदः शृंगमिषो भवेत् ॥४९॥**

म. अर्थ—नियमावांचून प्राणी जनावरासारखाच आहे. ह्यांत संशय नाहीं. काय खावें, काय न खावें हें त्यास कळत नाहीं. दोहोंमध्यें फक्त शिंगाचाच निराळेपणा आहे.

**शरीरे दुर्बले येऽपि तपः कुर्वंति धीधनाः**
**स्ववीर्यं प्रकटीकृत्य प्रशस्यास्ते नरोत्तमाः ॥ ५० ॥**

म. अर्थ—शरीर अशक्त असूनही जे बुद्धिमान आपल्या शक्तीप्रमाणें तपश्चर्या करितात, ते पुरुषश्रेष्ठ प्रशंसनीय होत.

**जातिहीनो भवेदर्च्यो धर्मयुक्तो विचक्षणः ॥**
**धर्महीनः सदा निंद्यः सुकुलोत्पन्नमानवः ॥ ५१ ॥**

म. अर्थ—विचारी धार्मिक जातिहीन असला तरी तो पूज्य होतो, व धर्महीन मनुष्य उत्तम कुलांत जन्मलेला असला तरी तो निंदेस पात्र होतो.

**अल्पश्रीसंयुता मर्त्या दानं कुर्वंत्यहर्निशं ॥**
**स्वशक्तिं प्रकटीकृत्य ते धन्या दानिनां मताः ॥ ५२ ॥**

म. अर्थ—थोडी संपत्ति असूनही जे मनुष्य औदार्य दाखवून आपले शक्तीप्रमाणें नेहमीं दान करितात, ते दान करणाऱ्यांत श्रेष्ठ होत.

**रोगक्लेशमदोन्मादैः सर्वदुःखपरीषहैः**
**स्वीकृतं ये न मुंचंति व्रतं स्युस्ते बुधैः स्तुताः ॥ ५३ ॥**

म. अर्थ—जे लोक रोग, कष्ट, अभिमान, उन्मत्तपणा सर्व-

प्रकारचे त्रास व उपसर्ग झाले तरी घेतलेलें व्रत सोडीत नाहींत ते लोक विद्वानांस वंदनीय होत.

दयासमो नास्ति परः सुधर्मः ॥
सर्वज्ञदेवादपरो न देवः ॥
श्रीनिस्पृहः सद्गुरुरेव नान्यः ॥
एतत्त्रयं त्वं भज मुक्तिमार्गं ॥ ५४ ॥

म. अर्थ–दयेसारखा दुसरा चांगला धर्म नाहीं, सर्वज्ञदेवाखेरीज दुसरा देव नाहीं, सद्गुरूखेरीज पंचाविषयीं निरिच्छ दुसरा नाहीं, हे तिन्ही मोक्षमार्ग आहेत, ह्यांचें तूं सेवन कर.

धन्यास्ते व्रतदानतत्पराधियो नित्यं जिनेंद्रार्चकाः ॥
धर्मध्याननिरस्तकल्मषविषाश्चैत्यालयोद्धारकाः ॥
सद्बिंबान्यपि कारयंति निपुणास्तेषां प्रतिष्ठां पुनः ॥
सच्छास्त्रश्रवणैकधर्मकुशला ये श्रावकाः स्युः क्षितौ५५

म. अर्थ–पृथ्वीवर जे श्रावकलोक व्रतांत व दानांत नेहमीं तत्पर असतील, नेहमीं जिनपूजा करीत असतील, धर्मध्यानानें पातकरूप विषाचा नाश करीत असतील, जिनमंदिरें बांधीत असतील, जिनप्रतिमा करवून त्यांची प्रतिष्ठा करीत असतील ते धन्य होत.

## ॥ सप्तव्यसनत्यागवर्णनं ॥

द्यूतक्रीडां प्रकुर्वंति येऽधमा नष्टबुद्धयः ॥
कुकीर्तिं द्रव्यनाशं च लब्ध्वा श्वभ्रे पतंति ते ॥५६ ॥

म. अर्थ–जे दुष्टबुद्धि नीच लोक द्यूत खेळतात, ते दुर्यश व द्रव्यनाश पाऊन नरकांत पडतात.

व्यसनानिकरमूलं दुःखदारिद्र्यबीजं ॥
निधनकरमसारं धर्मविध्वंसहेतुं ॥

नरकगमनमार्गं पापवृक्षालवालं ॥
त्यज झटिति विनिंद्यं भो नर द्यूतकृत्यं ॥ ५७ ॥

म. अर्थ—अरे मनुष्या, द्यूतकृत्य हें सर्व वाईट खोडींच्या समुदायास मूल आहे, दुःखाचें व दारिद्र्याचें मूल आहे, मरण आणणारें असून निंद्य आहे, धर्माचा नाश करणारें आहे, नरकास जाण्याचा मार्ग आहे, पातकरूप वृक्षाचें आळें आहे, ह्यास्तव हें निंद्य योग्य असें जुगार खेळण्याचें सोड.

पलाशनं प्रकुर्वंति येऽधमाः कृपया विना ॥
निंद्या दुष्टाशयास्तेपि मज्जन्ति श्वभ्रसागरे ॥ ५८ ॥

म. अर्थ—जे नीच निर्दयपणानें रक्तपान करितात ते दुष्टबुद्दि नरकरूप समुद्रांत बुडतात.

यस्यामिषं हि यो दुष्टो भुंक्ते तस्य पलं स वै ॥
हत्वाऽमुत्र च रोषेण तस्मात्त्वं त्यज पापदं ॥ ५९ ॥

म. अर्थ—जो दुष्ट ज्याचें मांस खातो त्याचें पुढले जन्मांत ज्यानें आपलें मांस खाल्लें त्याचें तो मांस खातो, ह्यास्तव हें पापकर्म सोडून दे.

अशुचिगृहमसारं जीवहिंसादिजातं ॥
कृमिकुलशतपूर्णं दर्शनस्याप्ययोग्यं ॥
विबुधजनविनिंद्यं पापकृत्यस्य मूलं ॥
कुकुलजनगृहीतं चामिषं त्वं त्यजाशु ॥ ६० ॥

म. अर्थ—मांस हें दुर्गंधाचें घर आहे, तुच्छ आहे, तें प्राणिवधापासून उत्पन्न होतें, तें शेंकडों किड्यांनीं भरलेलें असतें, तें पाहण्यास देखील चिळस येतें, ज्ञाते लोकांस तें प्रिय नसतें, तें पातकाचें मूल आहे, हलकट लोकांच्या मात्र तें आवडीचें असतें, तें मांस तूं लवकर टाकून दे.

**पीतमद्यो भवेन्निंद्यः पथि वा पतितो मुखे ॥**

**मूत्रं कृत्वा च लिखेच यो धिक् तस्याऽस्तु जीवितं॥६१॥**

म. अर्थ–दारु प्यालेला मनुष्य निंदेस पात्र होतो, रस्त्यावर बेशुद्ध पडून मूत पितो, असा जो मनुष्य असेल त्याच्या जीवितास धिकार असो.

**विवेकविकलः कृत्वा पीतमद्यः कुजन्मदं ॥**

**पापं हिंसान्यरामादि सत्यं श्वभ्रातिथिर्भवेत् ॥ ६२ ॥**

म. अर्थ–दारु पिऊन मदोन्मत्त होऊन विचारशून्य झालेला, वाईट गतीस नेणारें हिंसा व परस्त्रीगमन वगैरे पाप करून नरकाचा पाहुणा होतो.

**पलमद्यप्रसक्तां च मातंगादिषु लंपटां ॥**

**वेश्यां भजंति ये मूढा निंद्यास्ते भुवनत्रये ॥ ६३ ॥**

म. अर्थ–मद्यमांसाची आवड करणारी, महार पोरावर देखील मन ठेवणारी अशा वेश्येस जे लंपट होतात ते त्रिभुवनांत निंदेस पात्र होतात.

**वेश्यादिपरनारीषु संगं कुर्वंति येऽधमाः ॥**

**श्वभ्रे लोहाग्निरामाभिस्तेषामालिंगनं भवेत् ॥ ६४ ॥**

म. अर्थ–जे नीच, वेश्या वगैरे परस्त्रीशीं संग करितात, त्या नीचांस मरणानंतर नरकांत तापलेल्या लोखंडाचे पुतळीस भेटावें लागेल.

**सकलकुजनसेव्यां श्वभ्रगेहप्रतोलीं ॥**
**विकटमुखविकारां मद्यमांसप्रसक्तां ॥**
**बुधजनपरिनिंद्यां तस्करीं धर्मभांडे ॥**
**त्यज कुगतिकरां भो दूरतो मित्र वेश्यां ॥६५॥**

म. अर्थ—वेश्येचा सर्व जातीचे दुर्व्यसनी लोक उपभोग घेतात, वेश्या ही नरकगृहाची मोठी सडक आहे, तिची आपलेवर प्रीति नसल्याचे तिचे चेहऱ्यावरूनच समजतें, ती दारूची व मांसाची आवड करणारी आहे, धर्मरूप द्रव्याची चोरी करणारी आहे, विद्वान् लोकांनीं निंदिलेली आहे, तिच्या संगतीनें वाईट परिणाम होतो, अरे मित्रा, त्या वेश्येचा नाद सोडून दे.

**तृणेन स्पृष्टमात्रोपि किंचिद्दुःखमवैति यः ॥**
**हंति शस्त्रेण जीवादीन् कथं श्वभ्रातिथिर्न सः ॥६६ ॥**

म. अर्थ—हलूच गवताची काडी लागली तरी ज्याला दुःख होतें, तोच मनुष्य तीक्ष्णशस्त्रानें दुसऱ्याचे जीव घेतो, तो नरकाचा पाहुणा कसा होणार नाहीं ?

**सबलो दुर्बलस्यापि हंति यो यस्य मानवः ॥**
**सहेत वेदनां घोराममुत्र तत्कृतां ध्रुवं ॥ ६७ ॥**

म. अर्थ—जो सशक्त मनुष्य दुर्बल मनुष्यास येथें मारितो तो पुढील जन्मांत उलट ज्याला मारिलें त्याकडून मोठें दुःख पावतो.

**स्वधने हि गते स्वल्पे यो दुःखी जायते भृशं ॥**
**परद्रव्यं स गृण्हाति न स्यात्किं ? श्वभ्रनायकः ॥ ६८॥**

म. अर्थ—आपले थोडे पैसे नाहींसे झाले तरी ज्याला मोठें दुःख होतें तो जर अन्यायानें दुसऱ्याचे पैसे घेईल तर नरकांतील अधिकारी होणार नाहीं काय ?

**परद्रव्यापहारेण लभ्यते वधबंधनं ॥**
**घोरदुःखमिहामुत्र परस्वं त्यज सर्पवत् ॥ ६९॥**

म. अर्थ—दुसऱ्याचें द्रव्य घेतलें तर मरण किंवा कैद भोगावी लागते, ह्यालोकीं व परलोकीं अतिशय दुःख होतें, ह्यास्तव परद्रव्य सर्पासारखें टाकून दे.

**परस्त्रीसंगमासक्ता येऽधमा नष्टबुद्धयः ॥**
**वधबंधादिकं प्राप्य श्वभ्रे ते यांति सप्तमे ॥ ७० ॥**

म. अर्थ—जे दुर्बुद्धि नीच लोक दुसऱ्याच्या स्त्रियेच्या संगाची इच्छा करितात, ते मरण कैद वगैरे दुःख भोगून सातव्या नरकांत जातात.

**दुरिततरुकुवृष्टिं तस्करीं धर्मगेहे ॥**
**नरकसदनवीथ्यां कीर्तिवृक्षे कुठारीं ॥**
**जननमरणमूलां बंधविध्वंसदां भो ॥**
**त्यज झटिति परस्त्रीं त्वं सदा मुक्तिहेतोः ॥७१॥**

म. अर्थ—परस्त्री ही पातकरूप वृक्षावर पावसाची धार आहे, धर्मगृहांतील चोरी करणारी आहे, नरकगृहाचा मार्ग आहे, कीर्तिरूप वृक्षास कुऱ्हाड आहे, जन्ममरणास कारण आहे, तिचे संगतीनें मरण किंवा कैद भोगावी लागते, यास्तव तूं परस्त्रीची इच्छा करूं नको.

**द्यूतमांससुरावेश्याखेटचौर्यपरांगनाः ॥**
**त्यज त्वं व्यसनान्येव स्युःसप्त श्वभ्रदानि वै ॥७२॥**

म. अर्थ-जुगार, मांस, दारु, वेश्या, मृगया, चोरी, परस्त्री हीं सात व्यसनें सोडून दे. हीं सात व्यसनें प्रत्यक्ष नरक मार्ग आहेत.

**नरकाः संति सप्तैव व्यसनान्यपि सप्त वै ॥**
**अनुक्रमेण गच्छंति जीवास्तल्लंपटाशयाः ॥ ७३ ॥**

म. अर्थ—नरक सात आहेत, व व्यसनें ही सातच आहेत. पाळीपाळीच्या व्यसना प्रमाणें क्रमानें त्या त्या नरकास व्यसनी लोक जातात.

**एकैकव्यसनासक्ता नष्टा जीवा अनेकधा ॥**
**यः सप्तव्यसनासक्तः स किं?याति न दुर्गतिं ॥ ७४ ॥**

म. अर्थ-एक एका व्यसनाच्या नादानें कोट्यावधि जीव नाश पावले, मग जो मनुष्य सातांही व्यसनांचे स्वाधीन झालेला असेल, तो नरकास जाणार नाहीं काय ?

## ॥ योग्याचरणवर्णनं ॥

**अष्टम्यां च चतुर्दश्यां प्रोषधः क्रियते सदा ॥**
**कर्मणां निर्जराहेतुः श्रावकाचारपालकैः ॥ ७५ ॥**

म. अर्थ-श्रावकाचा आचार पाळणाऱ्यांनीं अष्टमी चतुर्दशीस उपवास नेहमीं करावा. त्यानें कर्मांचा क्षय होतो.

**अष्टम्यामुपवासं यो विधत्ते भक्तिपूर्वकं ॥**
**हत्वा कर्माष्टकं सोपि याति मुक्तिपदं ध्रुवं ॥ ७६ ॥**

म. अर्थ-अष्टमी चतुर्दशीस जो मनुष्य भक्तिपूर्वक उपवास करितो तो कर्माष्टकाचा नाश करून मोक्षास निश्चयानें जातो.

**प्रोषधं नियमेनापि यः कुर्यादष्टमे दिने ॥**
**स्वर्गराज्यादिकं प्राप्य सोपि याति परं पदं ॥ ७७ ॥**

म. अर्थ-जो मनुष्य नियमानें आठवे दिवशीं उपवास करितो तो स्वर्गसुख व राज्यसुख भोगून मोक्षास जातो.

**मासे मासे विधातव्याश्चतुःपर्वसु प्रोषधाः ॥**
**प्राणान्तोपि न भोक्तव्यं बुधैः स्वर्मुक्तिकामुकैः ॥ ७८ ॥**

म. अर्थ-बारामहिने दोन चतुर्दशी दोन अष्टमी ह्या दिवशीं मिळून चार उपवास करावे, जीवावर संकट गुदरलें तरी स्वर्गसुखाची व मोक्षसुखाची इच्छा करणाऱ्यांनीं भोजन करूं नये.

**गृहकृत्यादिकं कर्म त्यक्त्वा यः प्रोषधं चरेत् ॥**
**एकं सोपि चिरं पापं संचितं हंति शुद्धधीः ॥ ७९ ॥**

म. अर्थ--गृहकृत्य वगैरे कर्म सोडून जो कोणी एक

उपवास करील तरी तो निष्पापमनाचा पुरुष, पुष्कळ दिवस-पर्यंत सांचलेलें पाप नाश करितो. ( तो निष्पाप होतो. )

यः पर्वण्युपवासादि व्रतं त्यक्त्वा कुधीः पुनः ॥
कुर्यात्कामादिसंसेवां स स्यात् श्वभ्रातिथिर्ध्रुवं ॥८०॥

म. अर्थ–जो दुष्टबुद्धि पर्वणीस उपवासादिक व्रत करण्याचें सोडून स्त्रीसंभोग करील तो खरोखर नरकाचा पाहुणा होईल.

जिनालयं यथा शिल्पी कुर्वन्नुच्चैः पदं व्रजेत् ॥
कूपादिखनने चाधोऽधस्तद्वत्प्राणिनां गतिः ॥ ८१ ॥

म. अर्थ– जिनमंदिराचें शिखर बांधणारा कारागीर उंच उंच चढत जातो, व विहिर खोदणारा मनुष्य खोल खोल जातो तशी प्राण्यांची स्थिति आहे.

भिन्ने भिन्ने समुत्पन्ना देशे जातौ कुलेऽपि ये ॥
जिनस्य शासने भक्ता बांधवास्ते मता बुधैः ॥ ८२॥

म. अर्थ–निरनिराळ्या देशांत, जातींत, वंशांत, उत्पन्न झाले असले तरी, जिनधर्माविषयीं श्रद्धा बाळगणारे लोक पर-स्पर बंधु होत; असें ज्ञाते लोक मानितात.

सद्धर्मिणां समं रागद्वेषं कुर्वंति ये च ते ॥
दुष्टाशया महानिंद्या ज्ञेया मिथ्यादृशोऽधमाः ॥ ८३॥

म. अर्थ–धार्मिकांबरोबर जे दुष्ट लोक द्वेष करितात, ते नीच मिथ्यात्वी महानिंद्य अधम जाणावे.

भोजनं न कदा कुर्याद्रात्रौ पर्वाणि चावधौ ॥
यावज्जीवं हितस्यार्थं स्वर्गमुक्तिसुखाय वा ॥ ८४॥

म अर्थ–मरेपर्यंत कधीं ही रात्रीं, पर्वणीचे दिवशीं, सामा-यिकाचे वेळीं भोजन करूं नये, त्यायोगानें आपणास सुख हो-ऊन स्वर्गसुखाचा व मोक्षसुखाचा लाभ होतो.

## ॥ तात्पर्यवर्णनं ॥

सद्दृष्टिजीवा कृतवृत्तदाना ॥
मुक्तिं समिच्छंति न चान्यसौख्यं ॥
बीजं वने भूरिफलानि लोका ॥
यथा समिच्छंति तृणादिकं न ८५ ॥

म. अर्थ—चारित्र पाळणारे व दान देणारे सम्यग्दर्शनधारी जीव, मुक्तिसुखाची इच्छा करितात, दुसऱ्या सुखाची करीत नाहींत, गृहस्थ लोक पुष्कळ फळें शेतांत यावीं म्हणून इच्छितात, गवत फार वाढावें असें इच्छीत नाहींत.

तत्सौख्यं यत्र नासौख्यं सा गतिर्यत्र नागतिः ॥
तज्ज्ञानं यत्र नाज्ञानं भ्रातस्त्वं भज शाश्वतं ॥ ८६ ॥

म. अर्थ—जेथें दुःख नाहीं तें सुख, जेथें पुनरावृत्ति नाहीं ती गति, जेथें अज्ञान नाहीं तें ज्ञान, अशा शाश्वतास ( मोक्षास ) बंधो, तूं सेवन कर.

इंद्रचक्रादिजं सौख्यमंते यदि विनश्यति ॥
ततोस्माभिर्न तत्प्रार्थ्यं मुक्तिसौख्येन पूर्यतां ॥ ८७ ॥

म अर्थ—इंद्रपद, सार्वभौम राज्य जर शेवटीं नाश पावणारें आहे तर तें आम्हीं मागत नाहीं, आम्हांस अविनाशी मोक्षसुख पुरे.

सा नारी परिणेतव्या या न मृत्युवशं गता ॥
प्रार्थ्या मित्रगणा धीशैस्तपोयमदमादिकाः ॥ ८८ ॥

म. अर्थ—ती स्त्री वरावी कीं जिला मरणभय नाहीं. विद्वानांनीं तप, यम, दम, नियम, वगैरे मित्रमंडळी मिळण्याची खटपट करावी.

यत्सौख्यं त्रिदशेश्वरैर्नृखचरैश्चक्रेश्वरैर्भोगिभि-॥
र्भूते भावि च वर्तमानसमये स्वप्नेपि नासादितं ॥

तत्सौख्यादपि सौख्यमंतरहितं सिद्धा विभुंजंत्यहो ॥
भ्रातस्त्वं त्यज भोगजालमखिलं तत्सौख्यमिष्टं यदि

म. अर्थ—जें सुख देवेन्द्र, मनुष्य, विद्याधर, सार्वभौम, धरणींद्र, यांनीं भूत भविष्य वर्तमान काळांत देखील अनुभवलें नाहीं तें अमर्याद सुख सिद्ध परमेष्ठी अनुभवितात, हे बंधो, तुला तें सुख प्रिय असेल तर सर्व विषयोपभोग सोडून दे.

त्रिभुवनपतिपूज्यो गर्भकल्याणकाले ॥
सुरगिरिशिखरे च स्नापितो सिंधुतोयैः ॥
सुविरतिसमये यो वाहितो देवलोकै—॥
र्ददतु सुखममेयं वीतरागो गुणाढ्यः ॥ ९० ॥

म. अर्थ—जो त्रैलोक्यपति, गुणवान, सर्वज्ञ वीतराग( जिन ) गर्भकल्याणाचे वेळीं मेरुपर्वताचे शिखरावर क्षीरसमुद्राचे जलांनीं अभिषेकिला, व दीक्षासमयीं ज्याची पालखी देवेंद्रांनीं वाहिली तो तुम्हांस अतिशय सुख देवो.

अमरपतिसुसेव्यो लोकनाथो शरण्यः ॥
प्रकटकृतसुधर्मः पूर्वपूर्वे विदेहे ॥
मुनिगणधरसेव्यो वर्तमाने सुकाले ॥
विमलगुणसमुद्रः पातु सीमंधरो वः ॥ ९१ ॥

म. अर्थ—देवराजानें वंदिलेला, त्रैलोक्यपति, रक्षण करणारा, पूर्वविदेहांत प्रसिद्ध असणारा, मुनीश्वरांनीं व गणधरांनीं सेविलेला, निष्पाप गुणांचा समुद्र, वर्तमान कालांत सीमंधर नांवानें प्रसिद्ध असणारा जिन तुमचें रक्षण करो.

रागो यस्य न शांतता मनसि सद्वस्त्वादिसंगोज्झिता-
दस्त्रादेः परिवर्जनाच्च विलयं दोषा यदीया गताः ॥

तेनेतीह जिनस्य नाम शुशुभे श्रीवीतरागः स्फुटं ॥
देवेंद्रेण समर्चितोतिविमलो वो वीतरागोवतात् ९२

म. अर्थ—ज्याला विषयप्रीति नसून मनांत शांति आहे, परिग्रहत्यागामुळें व हातांत शस्त्र घेतलें नसल्यानें ज्याचे दोष नाहींसे झाले, त्यामुळें त्याचें वीतराग असें नांव खरोखर शोभतें, देवादिक ज्याला नमन करितात, जो निष्पाप आहे, तो वीतराग तुमचें रक्षण करो.

नाभेयादिजिनेश्वराश्च विमलाः ख्याता परे ये जिनाः
त्रैकाल्ये प्रभवा व्यतीतगणनाः सौख्याकराःप्राणिनां
ये सिद्धारमलास्तथांतरहिताः सर्वे मुनींद्राः सुराः ॥
ये ते सर्वगुणप्रदाश्च महिताः कुर्वंतु बोधं मम ॥ ९३ ॥

म. अर्थ—आदिनाथ वगैरे निर्दोष प्रख्यात जिनेश्वर, भूत भविष्य वर्तमान काळीं झालेले असंख्यात जिनेश्वर जे प्राणिमात्रांस सुख देतात, जे निष्पाप, अमर्याद सिद्ध परमेष्ठी तसेच सर्वगुणसंपन्न मुनीश्वर व देवेंद्र असतील ते सर्वजण मला ज्ञान देवोत.

सुभाषिताभिधं ग्रंथं धर्मवर्धनकारणं ॥
पठंतु ते महाभव्याः स्वर्गमुक्तिसुखप्रदं ॥ ९४ ॥

म. अर्थ—सुभाषित नांवाचा हा ग्रंथ धर्मवृद्धि करणारा असून स्वर्गाचें व मोक्षाचें सुख देणारा आहे, भव्यजीव ह्यास वाचोत.

सुभाषितमयी रत्नकंठिका यः करोति सः ॥
स्वकंठे भूषणं सम्यक् भाति धर्मसभादिषु ॥ ९५ ॥

म. अर्थ—सुभाषितरूप रत्नकंठिका जो भव्यजीव आपल्या गळ्यांत भूषण करितो तो धर्मसभांत शोभतो.

सुभाषिताख्यं सुरसं कवित्वं ॥
पठंति ये भव्यजनास्सदा ते ॥

निश्चित्य धर्मं पुनराचरंति ॥
स्वर्गं व्रजित्वापि च याति मुक्तिं ॥ ९६ ॥

म. अर्थ–हें सुभाषित नांवाचें सुरस काव्य जे भव्यजीव नेहमीं वाचतील ते धर्माचा निश्चय करून व तसें आचरण करून स्वर्गास जाऊन मोक्षास जातील.

अक्षरस्वरमात्रादिच्युतं किंचिन्मयोदितं ॥
प्रमादाज्ञानतः सर्वं क्षमां कुर्वंतु साधवः ॥ ९७ ॥

म. अर्थ–मीं बोललेल्या ह्या ग्रंथांत कोठें हयगईनें मूर्खपणानें अक्षर, स्वर, मात्रा चुकली असेल त्या सर्वांबद्दल सुज्ञ लोक क्षमा करोत.

ग्रंथपद्धतिमिमां मुनिनाथा ॥
दोषजालरहिताः श्रुतपूर्णाः ॥
शोधयन्तु तनुशास्त्रधरेण ॥
साहशाकृतिधरेण कृतोति ॥ ९८ ॥

म. अर्थ–दोषरहित असून मोठमोठ्या शास्त्रांत प्रवीण असणारे मुनीश्वर, ह्या कवित्वपद्धतीस हा मी अज्ञान आहे तरी आपला वेष घेतलेला आहे ह्या बुद्धीनें शुद्ध करोत.

जिनवरमुखयातं ग्रंथितं श्रीगणेंद्रैः ॥
त्रिभुवनपतिमान्यं विश्वतत्वैकदीपं ॥
अमृतमिव सुमिष्टं धर्मबीजं पवित्रं ॥
सकलजनहितार्थं ज्ञानतीर्थं हि जीयात् ॥ ३९९ ॥

म. अर्थ–जिनेश्वराचे मुखांतून निघालेलें व गणधरांनीं पाळलेलें, त्रैलोक्यपतीस देखील मान्य असणारें, विश्वतत्वाचा एक दीपच, अमृतासारखें गोड, धर्मास कारण, पवित्र असें ज्ञानतीर्थ सर्वलोकांचें कल्याण होण्यास्तव विजयी असो.

---

समाप्त.

# सज्जनचित्तवल्लभ

## ॐ नमो जिनाय

( शार्दूलविक्रीडितवृत्तं )

**नत्वा वीरजिनं जगत्त्रयगुरुं मुक्तिश्रियो वल्लभं ॥**
**पुष्पेषुक्षयनीतिबाणनिवहं संसारदुःखापहं ॥**
**वक्ष्ये भव्यजनप्रबोधजननं ग्रंथं समासादहं ॥**
**नाम्ना सज्जनचित्तवल्लभमिमं शृण्वन्तु सन्तो जनाः १**

म. अर्थ–जो मोक्षरूप लक्ष्मीचा पति आहे, ज्यानें सन्मार्गरूप बाणसमुदायानें मदनाचा नाश केला, जो संसारदुःखाचें निवारण करितो, जो त्रैलोक्याचा स्वामी आहे, त्या महावीर जिनास नमस्कार करून मी संक्षेपानें भव्यजीवांस संतोष उत्पन्न करणाऱ्या ह्या सज्जनचित्तवल्लभ नांवाचे ग्रंथास सांगतों, सज्जन लोक ऐकोत.

**रात्रिश्चंद्रमसा विनाब्जनिवहैर्नो भाति पद्माकरो ॥**
**यद्वत्पंडितलोकवर्जितसभा दन्तीव दन्तं विना ॥**
**पुष्पं गंधविवर्जितं मृतपतिस्त्रीवेह तद्वन्मुनि–॥**
**श्चारित्रेण विना न भाति सततं यद्यप्यसौ शास्त्रवान् २**

म. अर्थ–येथें ज्या प्रमाणें चंद्राखेरीज रात्रि शोभत नाहीं, कमलांचे समुदायाखेरीज जसें सरोवर शोभत नाहीं, पंडित ( विद्वान् ) लोकांशिवाय जसी सभा शोभत नाहीं, दांताखेरीज जसा हत्ती शोभत नाहीं, सुवासाखेरीज जसें फूल शोभत नाहीं, पति मरण पावलेली जसी विधवा बायको शोभत नाहीं, तसाच चारित्राखेरीज मुनीश्वर जरी तो मोठा विद्वान् असेल तरी शोभत नाहीं.

देहे निर्ममता गुरौ विनयता नित्यं श्रुताभ्यासता ॥
चारित्रोज्वलता महोपशमता संसारनिर्वेगता ॥
अन्तर्बाह्यपरिग्रहत्यजनता धर्मज्ञता साधुता ॥
साधो साधुजनस्य लक्षणमिदं संसारविच्छेदनम् ॥३॥

म. अर्थ–हे सज्जन मनुष्या, साधुजनाचें लक्षण असें असतें ऐक. त्यांचें स्वताचे शरीरावर प्रेम असत नाहीं, ते गुरूशीं नम्रतेनें वागतात, नेहमीं शास्त्राभ्यास करितात, त्यांचें आचरण निष्पाप असतें, ते फार शांत असतात, ते संसारापासून विरक्त झालेले असतात, त्यांनीं अभ्यन्तरपरिग्रह व बाह्यपरिग्रह सोडिले असतात, ( त्यांस परिग्रह नसतात ) त्यांस धर्ममार्ग समजतो, ते स्वभावानें चांगले असतात. ह्या त्यांच्या शुद्धाचरणानें जन्ममरण चुकतें.

किं? वस्त्रत्यजनेन भो मुनिरसावेतावता जायते ॥
क्ष्वेडेन च्युतपन्नगो गतविषः किं? जातवान् भूतले ॥
मूलं किं? तपसः क्षमेन्द्रियजयः सत्यं सदाचारता ॥
रागादींश्च बिभर्ति चेन्न स यतिर्लिङ्गी भवेत्केवलम् ॥४॥

म. अर्थ-अरे सज्जना, फक्त वस्त्र सोडुन नग्न झाला म्हणजे अशानें तो काय मुनि होतो? पृथ्वीवर सापानें आपली कात टाकून दिली म्हणजे तो काय निर्विष होतो? तपश्चर्येचें मूल काय? क्षमा, इंद्रियनिग्रहपणा, खरेपणा, सदाचरण हीं तपश्चर्येचीं साधनें होत, हीं नसतां क्रोध, मान, माया, लोभ वगैरे विकार त्यास असतील तर तो वेषधारी मात्र यति होय.

किं? दीक्षाग्रहणेन ते यदि धनाकांक्षा भवेच्चेतसि ॥
किं? गार्हस्थ्यमनेन वेषधरणेनासुन्दरं मन्यसे ॥
द्रव्योपार्जनचित्तमेव कथयत्यभ्यन्तरस्थाङ्गजं ॥
नो चेदर्थपरिग्रहग्रहमतिर्भिक्षोर्न सम्पद्यते ॥ ५ ॥

म. अर्थ—जर तुझे मनांत द्रव्याची इच्छा असेल तर दीक्षा घेऊन काय करावयाचें? ह्या वेषांतरापेक्षां गृहस्थाश्रम तुला वाईट कां वाटतो? द्रव्यावरील तुझें लक्ष्यच तुझें खरें खरें हृद्गत काय आहे तें कळवीत आहे, नाहींपेक्षां हे यतिवरा, तुला द्रव्यावर इतकी आसक्ति झाली नसती!

योषाषण्ढकगोविवर्जितपदे त्वं तिष्ठ भिक्षो सदा ॥
भुक्त्वाहारमयाचितं परगृहे लब्धं यथासम्भवं ॥
षट्स्वावश्यकसत्क्रियासु निरतो धर्मानुरागं वहन् ॥
सार्धं योगिभिरात्मभावनपरै रत्नत्रयालंकृतः ॥ ६ ॥

म. अर्थ—हे यतीश्वरा, तूं स्त्री, नपुंसक, पशु वगैरे नसणाऱ्या एकांत स्थळीं रहात जा, परक्याचे घरीं आयतेवेळीं जे पदार्थ मिळतील ते भक्षण कर, अमुकच पदार्थ पाहिजेत असें मागूं नकोस, सहाप्रकारचीं आवश्यक कर्में पाळीत जा, धर्मावर प्रीति कर, तत्वज्ञानी मुनीश्वरांसहवर्तमान रत्नत्रयांचें भूषण करून सुशोभित हो.

दुर्गन्धं वदनं वपुर्मलभृतं भिक्षाटनाद्भोजनं ॥
शय्या स्थण्डिलभूमिषु प्रतिदिनं कट्यां न ते कर्पटम् ॥
मुण्डं मुण्डितमर्धदग्धशववत्त्वं दृश्यसेऽन्यैर्जनै– ॥
स्साधोऽद्याप्यबलाजनस्य भवतो गोष्ठी कथं शोभते?

म. अर्थ—अरे सज्जना, तुझे तोंडास दुर्गंधि येते, शरीर मलिन झालें, भिक्षा मागून उदरपोषण करावें लागतें, ओट्याचे जमिनीवर तुला दररोज निजावें लागतें, कमरेला तुझ्या लंगोटीची चिंधी नाहीं, मस्तक मुंडण केलेलें, अर्धवट जळालेल्या प्रेतासारखें तुझें स्वरूप लोकांस दिसत आहे तरी अद्याप तुला बायका मनुष्यांच्या गोष्टी सांगणें शोभतें काय?

अङ्गं शोणितशुक्रसम्भवमिदं मेदोस्थिमज्जाकुलं ॥
बाह्ये माक्षिकपत्रसन्निभमहोचर्मावृतं सर्वतः ॥
नो चेत्काकबकादिभिर्वपुरहो जायेत भक्ष्यं ध्रुवं ॥
दृष्ट्वाद्यापि शरीरसद्मानि कथं निर्वेगता नास्ति ते ॥८॥

म. अर्थ—हें शरीर रक्तांत रेतापासून जन्मलें आहे, मेंदु, हाडें, कातडीं ह्यांनीं भरलेलें आहे, बाहेरून माशीच्या पंखासारख्या पातळशा मोठ्या थोरल्या कातड्यानें चोंहोंकडून गुंडाळलेलें आहे, असें कातड्यांत गुंडाळलें नसतें तर कावळे बगळे वगैरे पक्ष्यांचें भक्ष्य खरोखर झालें असतें, असें तूं पहात असून अद्याप तुझें शरीररूप गृहाविषयीं वैराग्य कसें झालें नाहीं? ( तूं शरीरावरील ममत्व कसें सोडूं शकत नाहींस? )

दुर्गन्धं नवभिर्वपुः प्रवहति द्वारैरिमैस्सन्ततं ॥
तं दृष्ट्वापि च यस्य चेतसि पुनर्निर्वेगता नास्ति चेत् ॥
तस्मान्यद्भुवि वस्तु कीदृशमहो तत्कारणं कथ्यतां ॥
श्रीखण्डादिभिरङ्गसंस्कृतिरियं व्याख्याति दुर्गन्धताम्

म. अर्थ—हें शरीर नऊ छिद्रांनीं नेहमीं मलिन रस वाहतें, ( शरीराचा नऊ छिद्रांतून मलिन रस नेहमीं बाहेर येतो ) त्याला पाहूनही ज्याचे मनांत वैराग्य होत नाहीं त्याला दुसरी वस्तु कोणती राहिली? चंदनादिकांनीं आंग सुशोभित केलें तरी दुर्गंधता येतेच मग तें चंदन आंगास लावण्याचें प्रयोजन काय आहे? सांगा.

स्त्रीणां हावविलासविभ्रमगतिं दृष्ट्वानुरागं मना-॥
ग्मागास्त्वं विषवृक्षपक्वफलवत् सुस्वादुवेत्यस्तदा ॥
ईषत्सेवनमात्रतोऽपि मरणं पुंसां प्रयच्छन्ति भो ॥
तस्माद्दृष्टिविषाहिवत्परिहर त्वं दूरतो मृत्यवे ॥ १० ॥

म. अर्थ—स्त्रियांच्या हावभाव विलास वगैरे चेष्टांस पाहून

तूं थोडा देखील भुलूं नकोस, विषवृक्षाचीं फळें गोड झालीं तरी तीं खाणें हितकर नव्हे, त्यांचें थोडें सेवन केलें तरी देखील मनुष्यास ( पुरुषांस ) मरण येतें, त्याकरितां मरण येऊं नये अशी इच्छा असल्यास दुष्ट विषारी सर्पाप्रमाणें त्या स्त्रियांस दूर सोडून दे. ( त्यांच्या सहवासास राहूं नकोस. )

यद्यद्वाञ्छति तत्तदेव वपुषे दत्वा सुपुष्टं त्वया ॥
सार्धं नैति तथाविधं जडमते मित्रादयो यान्ति किं? ॥
पुण्यं पापमिति द्वयं च भवतः पृष्ठेऽनुयास्यते– ॥
स्तस्मान्मास्मकृथा मनागपि भवान् मोहं शरीरादिषु ॥

म. अर्थ–जें जें इच्छावें तें तें देऊन तूं शरीरास पुष्ट केलें तें तशा प्रकारचें शरीर देखील तुजबरोबर येत नाहीं, मग मंदबुद्धे, मित्रमंडळी वगैरे कशी येतील? पुण्य आणि पाप मात्र तुझ्या पाठोपाठ येईल, ह्यास्तव तूं शरीरादिकांवर थोडें देखील ममत्व करूं नकोस.

शोचन्ते न मृतं कदापि वनिता यद्यस्ति गेहे धनं ॥
तच्चेन्नास्ति रुदन्ति जीवनधिया स्मृत्वा पुनः प्रत्यहं ॥
कृत्वा तद्दहनक्रियां निजनिजव्यापारचिन्ताकुला– ॥
स्तन्नामापि च विस्मरन्ति कतिभिस्संवत्सरैर्योषितः ॥

म. अर्थ–घरांत द्रव्य पुष्कळ असेल तर मृतपुरुषाबद्दल स्त्रिया कधींही दुःख करीत नाहींत, तें जर नसेल तर मात्र चरितार्थाची पंचाईत पडेल, ह्यामुळें दररोज पुनः पुनः त्याची आठवण करून रडतात, त्याचा प्रेतसंस्कार केल्यावर आपआपल्या कामांत गुंतल्यावर कितीएक वर्षांनीं स्त्रिया त्या मृतपुरुषाचें नांव देखील विसरून जातात.

अष्टाविंशतिभेदमात्मनि पुरा संरोप्य साधो व्रतं ॥
साक्षीकृत्य जिनान्गुरूनपि कियत्कालं त्वया पालितं ।

भङ्क्तुं वाञ्छसि शीतवातविहतो भूत्वाधुना तद्व्रतं ॥
दारिद्र्योपहतस्स्ववान्तमशनं भुङ्क्ते क्षुधार्तोऽपि किं॥

म. अर्थ–सज्जना, तूं पूर्वीच मनांत अठ्ठावीस प्रकारचे भेद असणारें व्रत करण्याचें योजिलें, जिनास व गुरूस साक्ष ठेविलेंस, कितीएक दिवसपर्यंत तूं पाळिलेंस, आणि आतां थंड वाऱ्यानें दुःख झाल्यामुळें तूं तें मोडूं इच्छितोस? फार दारिद्र्य आलें ह्मणून भूक लागल्यावर कोणी आपलाच ओक खातो काय?

अन्येषां मरणं भवान् गणयति स्वस्यामृतत्वं सदा ॥
देहं चिन्तयसीन्द्रियद्विपवशी भूत्वा परिभ्राम्यसि ॥
अद्य श्वः पुनरागमिष्यति यमो न ज्ञायते तत्वतः ॥
तस्मादात्महितं कुरु त्वमचिराद्धर्मं जिनेन्द्रोदितम् १४

म. अर्थ–तूं दुसऱ्याचे मरणाचे दिवस मोजतोस, व आपल्या शरीरास अमर समजतोस, इंद्रियरूप हत्तीच्या स्वाधीन होऊन भटकतोस, आज मृत्यु येईल किंवा उद्यां येईल हें देखील खरें समजत नाहीं, यास्तव, जिनेश्वरांनीं सांगितलेला, आपलें हित करणारा धर्म लवकर कर.

सौख्यं वाञ्छसि किं? त्वया गतभवे दानं तपो वा कृतं
नो चेत्त्वं किमिहैवमेव लभसे लुण्ट्या तदत्रागतम्?॥
धान्यं किं? लभते विनापि वपनं लोके कुटुम्बी जनो ॥
देहे कीटकभक्षितेक्षुसदृशे धर्मं समारोपय ॥ १५ ॥

म. अर्थ–सुखाची इच्छा करितोस तर तूं मागील जन्मीं दान किंवा तप कांहीं केलें आहे काय? नाहींपेक्षां तें सुख तुला येथें कसें मिळेल? त्याची काय येथें लूट लागली आहे? संसारी मनुष्यास पेरल्यावांचून आपापच धान्य कधीं तरी

आयुष्यं तव निद्रयार्धमपरार्धायुस्त्रिभेदादहो ॥
बालत्वाज्जरया कियद्व्यसनतो यातीति देहिन् वृथा ।
निश्चित्यात्मनि मोहपाशमधुना सञ्छिद्य बोधासिना
मुक्तिश्रीवनितावशीकरणकृच्चारित्रमाराधय ॥ १६ ॥

म. अर्थ—अरे प्राण्या, तुझें आयुष्य झोंपेंत अर्धभाग गेलें, बाकी अर्धभाग आयुष्य, बाल्यदशा, वृद्धत्व, दुर्व्यसन ह्या तिन्ही कारणामुळें व्यर्थ जात आहे, हें मनांत आणून ज्ञानरूप खड्गानें मोहरूप पाश तत्काळ तोडून मोक्षलक्ष्मीरूप स्त्री स्वाधीन करून देणारें ( मोक्ष देणारें ) चारित्र संपादन कर.

लब्ध्वा मानुषजातिमुत्तमकुलं रूपं च नीरोगतां ॥
बुद्धिं धीजनसेवनं सुचरणं श्रीमज्जिनेन्द्रोदितम् ॥
लोहार्थं वसुपूर्णभेत्रभिदिवत् स्तोकाय सौख्याय भो
देहिन् देहसुपोतकं गुणभृतं भेत्तुं किमिच्छास्ति ते १७

म. अर्थ—मनुष्यजाति, उत्तमवंश, सुंदरस्वरूप, आरोग्य, बुद्धि, विद्वज्जनांची सेवा, जिनेश्वरांनीं सांगितलेल्या रीतीचें सदाचरण मिळालें असून लोखंडासाठीं सोन्यानें भरलेलें जहाज फोडणाऱ्या प्रमाणें अल्प सुखाकरितां अरे जीवा, गुणवान अशी देहरूप नौका फोडण्याची तुझी इच्छा आहे काय?

यत्काले लघुभाण्डमण्डितकरो भूत्वा परेषां गृहे ॥
भिक्षार्थं भ्रमतस्तदा न भवतो मानापमाने सदा ॥
भिक्षो तापसवृत्तितो न लभसे किं तप्यसेऽहर्निशं ॥
श्रेयोर्थं किल सह्यते मुनिवरैर्बाधा क्षुधाद्युद्भवा ॥ १८ ॥

म. अर्थ भिक्षो, ज्यावेळीं हातांत लहानसें पात्र घेऊन भिक्षेसाठीं दुसऱ्यांचे घरोघर फिरतोस त्यावेळीं तुला मानाची व अपमानाची परवा कां असत नाहीं? तपश्चर्येलाच रात्रंदिवस

कां त्रासतोस ? कल्याणासाठीं मुनीश्वरांनीं क्षुधातृषादि बाधा खरोखर सोसिली पाहिजे.

मागास्त्वं युवतीगृहेषु सततं विश्वासितां तत्समं ॥
विश्वासाज्जनवाच्यता भवति ते न स्यात्ततः पूज्यता
स्वाध्यायानुरतो गुरूक्तवचनं शिष्ये समारोपयं ॥
तिष्ठेवं विकृतिं पुनर्व्रजासि येद्यासि त्वमेव क्षयम्॥१९॥

म. अर्थ–भिक्षा, तूं वारंवार स्त्रियांचे घरीं जाऊं नकोस, त्यांच्याशीं स्नेह करूं नकोस, स्नेहामुळें लोकांत तुझी निंदा होईल, त्या निंदेमुळें तुझी प्रतिष्ठा रहाणार नाहीं. नेहमीं स्वाध्याय कर, गुरूंनीं सांगितलेलें वचन शिष्यजनांस सांग, अशा रीतीनें रहा, जर पुन्हा विकार पावशील तर तूं देखील नाश पावशील.

एकाकी विहरत्यनावृतबलीवर्दो यथा स्वेच्छया ॥
योषामध्यरतस्तथा त्वमपि भो त्यक्त्वाऽत्मयूथं यते ॥
तस्मिंश्चेदभिलाषिता न भवतः किं ? भ्राम्यासि प्रत्यहं॥
मध्ये साधुजनस्य तिष्ठसि न किं ? धृत्वा सदाचारतां २०

म. अर्थ–अनिवार झालेला बैल जसा स्वच्छंद एकटा फिरतो, तसाच तूं आपली मंडळी सोडून स्त्रियांच्या अमंगल रतिसुखासाठीं कां फिरतोस ? त्याची जर तुला आवड नाहीं तर दररोज कां फिरतोस ? साधुलोकांच्या मंडळींत सदाचरण पाळून रहात कां नाहींस ?

किं संस्कारशतेन विड्जगति भो काश्मीरजं जायते ? ॥
किं देहश्शुचितां व्रजेत्यनुदिनं प्रक्षालितोप्यम्भसा ? ॥
संस्कारो नखदन्तवक्त्रवपुषां साधो त्वया त्यज्यतां ॥
नाकामी किल मण्डनप्रिय इति त्वं सार्थकं मा कृथाः २१

म. अर्थ—अरे भिक्षो, विष्ठेस नानाप्रकारचीं सुगन्धिद्रव्यें लाविलीं तर ती विष्ठा केशर होईल काय? तसेंच हें मलिन शरीर दररोज स्वच्छ पाण्यानें धुतलें ह्मणून निर्मळ होईल काय? सज्जन मनुष्या, नखें, दांत, तोंड सुशोभित करण्याचे भरीस पडूं नकोस, विरक्त मनुष्य नट्टापट्टा करणारा असतो हें वाक्य तूं खरें करून दाखवूं नकोस.

**क्रीतान्नं भवतो भवेत्कदशनं रोषस्तदा श्लाघ्यते ॥**
**भिक्षायां यदवाप्यते यतिजनैस्तद्भुज्यतेऽत्यादरात् ॥**
**भिक्षो भाटकसद्मसन्निभतनोः पुष्टिं वृथा मा कृथाः ॥**
**पूर्णे किं? दिवसावधौ क्षणमपि स्थातुं यमो दास्यति २२**

म. अर्थ—विकत आणलेलें अन्न तुला बरें वाटणार नाहीं तर त्यावेळीं तुझें रागावणें बरोबर आहे. मुनीश्वरांनीं भिक्षेंत जें मिळेल तें आवडीनें खाल्लें पाहिजे. यतीश्वरा, भाड्याच्या घरासारख्या ह्या शरीराची व्यर्थ पुष्टि करूं नकोस, कारण आयुष्याची मुदत भरल्यावर त्या शरीरांत क्षणभर तरी तुला यम राहूं देईल काय?

**वेतालाकृतिमर्धदग्धमृतकं दृष्ट्वा भवन्तं यते ॥**
**यासां नास्ति भयं त्वया सममहो जल्पन्ति चेत्प्रत्युत ॥**
**राक्षस्यो भुवि नो भवन्ति वनिता मामागता भक्षितुं ॥**
**मत्वैवं प्रपलायतां मृतिभयात्त्वं तत्र मा स्थाः क्षणं २३**

म. अर्थ—यतीश्वरा, वेताळासारखा भयंकर दिसणाऱ्या, अर्ध जळालेल्या प्रेतासारख्या तुला पाहून ज्या स्त्रियांना भय वाटत नाहीं, तुजबरोबर गप्पा गोष्टी सांगण्याचा यत्न करितात, त्या [illegible] नव्हत, राक्षसी आहेत त्या मला खाण्यास आल्या [illegible] असें मानून मरणाचे भयानें तूं तेथून पळून जा. तेथें [illegible]भर देखील राहूं नकोस.

लब्धोर्थो यदि दानधर्मविषये दातुं न यैः शक्यते ॥
दारिद्र्योपहतास्तथापि विषयासक्तिं न मुञ्चंति ये ॥
धृत्वा ये चरणं जिनेन्द्रगदितं तस्मिन्समन्दोधमा-॥
स्तेषां जन्म निरर्थकं गतमजाकण्ठे स्तनाकारवत् ॥२४॥

म. अर्थ-जरी पैसा मिळाला तरी दानधर्माकडे तो खर्च करणें ज्यांच्यानें होत नाहीं, दारिद्र्यानें पीडिले असले तरी ज्यांच्यानें विषयप्रीति सोडवत नाहीं, जिनेश्वरांनीं सांगितले-ल्या रीतीनें आचरण करण्याचे आरंभिलें तरी तें ही योग्य रीतीनें ज्यांकडून होत नाहीं, त्यांचे जन्म शेळीचे गळ्यांतील स्तनासारखें व्यर्थ होय.

वृत्तैर्विंशतिभिश्चतुर्भिरधिकैस्सल्लक्षणेनान्वितैः ॥
ग्रन्थं सज्जनचित्तवल्लभमिमं श्रीमल्लिषेणोदितं ॥
श्रुत्वात्मेंद्रियकुञ्जरान् समटतो रुन्धन्ति ते दुर्जयान् ॥
विद्वांसो विषयाटवीषु सततं संसारविच्छित्तये ॥२५॥

म. अर्थ-चांगल्या लक्षणांनीं युक्त असणाऱ्या चोवीस श्लो-कांनीं श्रीमल्लिषेणाचार्यांनीं हा सज्जनचित्तवल्लभ ग्रन्थ रचिला आहे, विद्वान् लोक मोक्षप्राप्तीसाठीं ह्या ग्रन्थाचें श्रवण करून न आटोपणाऱ्या, संसाररूप अरण्यांत भटकणाऱ्या आ-पल्या इंद्रियरूप हत्तींस वळवून आपले स्वाधीन ठेवितात. ( विद्वान्लोक ह्या ग्रन्थश्रवणानें मनोनिग्रह करूं शकतात. )

---

समाप्त.

